# स्वाति

लेखक

रघुनाथ गोविंद सरदेसाई




१ एप्रिल १९३९

# स्वाति




कॉन्टिनेन्टल बुक सर्व्हिस, पुणें.



## देवदत्त

अन्नपूर्णेनें सोप्यावरची खिडकी उघडून बाहेर नजर फेकली. आकाश काळ्या ढगांनी भरून गेले होते. अंगाला झोंबणारा गार वारा सुटला होता. लवकरच पावसाची जोराची सर येईल अशी चिन्हें दिसत होती. आधीच मावळतीस कलल्यामुळे निष्प्रभ झालेल्या सूर्याची किरणे अभ्राच्छादनामुळे लुप्तप्राय झाल्यासारखी दिसत होती. पृथ्वीवर एक प्रकारची उदास अवकळा आल्याचे अन्नपूर्णेच्या दृष्टीस पडले.

हा देखावा पाहताच तिच्या मनात काही एक विचार येऊन, शिवताना मध्येंच बोटाला सुई टोंचून अंग शहारते, तसे तिचे अंग रोमांचित झालें.

" अगबाई, आता देवदत्त पावसात सांपडून भिजणार—"

तिच्या तोंडून अस्फुट शब्द निघाले आणि तिच्या चेहऱ्यावर चिंतेचे पटल पसरलें. देवदत्त पावसात न सापडता सुखरूप घरी कसा येईल

या विचारात ती असता सहजगत्याच तिची नजर उजव्या बाजूला दिसणाऱ्या राजरस्त्यावर गेली, आणि कोंडलेले पाणी मुक्तता होताच विस्तारावे तद्वत् तिचे डोळे आनंदाने विस्तार पावले. त्या राजरस्त्यावरून अन्नपूर्णेच्या बिऱ्हाडाकडील बोळाच्या वळणावरून एक बालमूर्ति खाली मान घालून हळूहळू येत असलेली तिच्या दृष्टीस पडली, आणि एकाच दृष्टिक्षेपात मोत्याचें पाणी ओळखणाऱ्या कसबी जवाहिऱ्याप्रमाणें तिनें देवदत्तास तात्काळ ओळखलें.

ती खिडकी सोडून उत्सुकतेनें झटकन् दाराकडे धावली. न जाणो कदाचित् इतक्यात पाऊस आला तर हलके हलके पावलें टाकीत येणाऱ्या देवदत्ताला चार थेंबाचा तरी प्रसाद मिळावयाचा, म्हणून धावत येण्याबद्दल त्याला सूचना द्यावी या उद्देशाने ती दाराशी गेली. पण देवदत्ताच्या अवताराकडे पाहताच ते इशाऱ्याचे शब्द तिच्या ओठावरच जिरले.

नेहमी अवखळ आनदानें उडया मारीत येणारा देवदत्त आज जड पावलानी मार्ग आक्रमीत असलेला तिला दिसला. त्याची पावले भाराक्रांत पडत होती. गुलाबाच्या फुलावर सदैव विलसणाऱ्या मोहक तेजाप्रमाणें देवदत्ताच्या चेहऱ्यावर नेहमी खेळणारें मधुर स्मित आज अवसेच्या चद्राप्रमाणें लोप पावले होतें. हातातून गळू पाहणाऱ्या पुस्तकाची जणू त्याला शुद्धहि नसावी असें दिसत होते. नेहमीची सवय म्हणूनच केवळ त्याची पावले त्याला घराकडे वाहून नेत होती.

आपल्या लाडक्या देवदत्ताची ही अवस्था पाहताच अन्नपूर्णेचे हृदय पिळवटून गेलें. क्षणार्धात किती तरी कुशंका तिच्या मातृहृदयास तरवारीच्या ओझरत्या वाराप्रमाणे चाटून गेल्या. ती हतबुद्ध होऊन

देवदत्ताच्या उदास मूर्तीकडे पाहतच राहिली. देवदत्त घराजवळ येताच ती आवेगाने त्याच्याकडे धावली.

" का रे बाळा, काय झालं तुला आज ? "

असे करुणापूर्ण स्वरानें विचारून देवदत्ताला हृदयाशी कवटाळण्यासाठी तिनें आपले हात पसरले.

परंतु देवदत्ताने तिचे ते प्रेमळ हात रागाने दूर ढकलून दिले, आणि तिच्याकडे क्रुद्ध दृष्टिक्षेपाबरोबरच हातातील पाटीदप्तर फेकून तो तेथून मुसमुसत तडक घरात निघून गेला.

क्षणमात्र या घटनेचा अर्थ तिच्या लक्षात आला नाही. दारातून रागानें पाय आपटीत घरांत शिरणाऱ्या देवदत्ताच्या पाठमोऱ्या आकृतीकडे ती पाहत राहिली. पण, देवदत्त पलीकडच्या खोलीत शिरून दृष्टीआड होताच एखाद्या स्वप्नातून जागृति यावी तद्वत् अन्नपूर्णा भानावर आली. आपल्या डोक्यातील उधळलेल्या विचाराबरोबर रस्त्यात पडलेल्या देवदत्ताच्या पुस्तकाचा पसारा तिने सावरून घेतला. रस्त्यात पडून फुटलेल्या पाटीच्या तुकड्याकडे एक सकरुण दृष्टिक्षेप टाकून ती जड पावलानी घरात गेली.

झोपण्याच्या खोलीत एका वळकटीवर दोन्ही हातात तोंड खुपसून देवदत्त स्फुंदून स्फुंदून रडत होता. अंगावरील कोट-टोपी त्याने काढून अस्ताव्यस्त फेकून दिली होती. अन्नपूर्णेनें हातातील पुस्तकें कोनाड्यात ठेवली व इतस्ततः पडलेले देवदत्ताचे कपडे उचलून नीट ठेविले.

नंतर ती देवदत्ताजवळ जाऊन बसली व त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली—

" बाळा, देवदत्ता, आज काय होतंय् तुला ? मला नाही का सांगणार ? "

पण देवदत्ताने आईचा हात पुन्हा झिडकारून आपले तोंड दुसऱ्या बाजूस वळविले व रडणें पूर्ववत् सुरूच ठेविले.

अन्नपूर्णेचे डोळे पाण्याने भरून आले. आज दहा वर्षांच्या अवधीत देवदत्तानें तिच्याशीं इतके कठोर वर्तन कधीच केले नव्हतें. अन्नपूर्णेच्या हृदयाचा तो एकुलता एक ठेवा होता. तिचे देवदत्तावर निस्सीम प्रेम होतें, आणि त्या प्रेमास देवदत्त पात्रहि होता यात शंका नाही. वेलीमुळें फुलाला अवश्य त्या जीवनरसाचा लाभ व्हावा आणि सुकुमार फुलामुळें त्या वेलीची जीवनशोभा वृद्धिगत व्हावी तद्वत् अन्नपूर्णेच्या प्रेमरसाचा प्रवाह देवदत्ताचे जीवनपुष्प बहरवीत होता, आणि देवदत्ताच्या मधुर सहवासामुळें अनाथ अन्नपूर्णेच्या अभागी जीवनात सुखचंद्र विलसत होता. तिच्या त्या जीवनचंद्राला दुःखराहूनें ग्रासलेलें पाहून अन्नपूर्णेचें अंतःकरण तिळतिळ तुटल्यावाचून कसें राहील ?

रडत्या देवदत्ताला अन्नपूर्णेने बळेनेंच आपल्या मांडीवर उचलून घेतले. देवदत्त प्रतिकार करीत असताहि तिनें आपल्या लुगड्याच्या पदराने त्याचे वाहते डोळे व म्लान झालेले तोंड पुसले आणि त्याचें मस्तक आपल्या हृदयाशी दाबीत तिने करुणकंपित आवाजात विचारले—

" काय झालं बाळ, तुला आज ? मास्तरांनी मारलं का माझ्या बाळाला ? ...डोकं दुखतं ? चेपू का जरा ? ...माझ्याशी बोलायूच नाही का ?—"

पण देवदत्तानें तिचे हात दूर करण्याचा वृथा प्रयत्न करीत तुटक आवाजात म्हटलें—

" जा, मी नाही तुझ्याशी बोलणार ! "

" असं कां बर वेड्यासारखं करावं ? देवदत्ता, मी तुझी आई ना ? "

"नकोस तूं मला आई." देवदत्त रागाने म्हणाला.

त्याला त्या वाक्याचा अर्थहि कळला नसेल. पण त्याने न कळत उच्चारलेल्या या एकाच वाक्याने अन्नपूर्णेच्या हृदयाला शेंकडो सुया टोंचल्यासारख्या वेदना झाल्या. तिला आलेला हुंदका आवरणे अशक्य झाले, आणि तिच्या डोळ्यातून कढत कढत अश्रु टपाटप बाहेर पडूं लागले.

"असं काय बर बोलावं बाळ?" अन्नपूर्णा रडत रडत म्हणाली, "शहाणा ना तूं? तुला काय हवं आहे, मला सांग—मी तुला देतें. पण राजा, असा रागावूं नकोस रे माझ्यावर......बाळा, देवदत्ता—"

"मला देवदत्ता म्हणूं नकोस. मला नाही ते घाणेरडं नाव आवडत." देवदत्त उसळून म्हणाला.

आता मात्र देवदत्ताच्या दुःखाचे खरें कारण अन्नपूर्णेच्या लक्षात आले. गेले सात-आठ दिवस आपलें देवदत्त हे नाव बदलण्या-विषयी देवदत्तानें अन्नपूर्णेजवळ निकडीचा हट्ट धरला होता. शाळें-तून आला, की त्याने आपले नाव बदलण्याबद्दल आईला विचारावें. व 'उद्या, उद्या' अशी तिने त्याची समजूत काढावी, असा प्रकार चालला होता. देवदत्ताचा हा हट्टच असा होता, की तो पुरा करणें अन्नपूर्णेच्या शक्तीबाहेरचें काम होतें.

आणि देवदत्ताच्या या हट्टाचा उगम त्याच्या शाळेंत झाला आहे हेंहि देवदत्ताच्या सांगण्यावरून अन्नपूर्णेस समजून चुकलें होते. आज तीन वर्षे देवदत्त त्या शाळेंत जात होता. नुकताच मराठी दुसरीच्या

परीक्षेंत नंबर मिळवून तो तिसरीत गेला होता. आणि याच वर्गात त्याच्या या विचित्र हट्टाला कारण मिळून वाचा फुटली होती.

तिसरीचा वर्ग प्रथमतःच भरला त्या दिवशी तिसरीच्या मास्तरानें वर्गात नवीन आलेल्या मुलाची नावे विचारून घेतली. सर्वांनी आपापली नांवें सांगितली. देवदत्ताची पाळी आली तेव्हा त्यालाहि मास्तरांनी विचारले—

"काय रे मुला, तुझ नांव काय ?"

"देवदत्त, मास्तर."

"अरे, देवदत्त काय ? सगळ नांव सांग."

"देवदत्त शकर कुळकर्णी."

"काय रे, तुझी जात कोणती ?"

"ब्राह्मण, मास्तर."

"छट्, कांही तरीच सांगतोस. तूं बाटगा खिश्चन असला पाहिजेस ! अरे, तुझं नाव खिश्चन आहे—देवदत्त. इतर मुलाची नावें बघ कशी राम, लक्ष्मण, नारायण, विष्णु अशी आहेत. तुझं देवदत्त नाव मात्र खिश्चन आहे. आता घरी जाऊन नांव बदलून घे आईबापाकडून."

मास्तरानीं केलेल्या या 'विनोदा'मुळे कापराच्या ढिगाऱ्यावर जळकी काडी पडावी तसें झालें. एवढी साधी गोष्ट इतके दिवस आपणा कोणाच्या कशी लक्षात आली नाहीं याचे वर्गातील सर्व मुलाना मोठें नवल वाटले, आणि मास्तरानी ती त्याच्या नजरेस आणून देतांच त्यांच्या हाती केवळ कोलीत दिल्यासारखेंच झाले. ती मुलें देवदत्ताला 'बाट्या', 'खिश्चन', 'गाईचें मास खाणारा' म्हणून चिडवूं लागलीं. मुलेंच तीं ! एकानें कल्पना काढली, की तिचा प्रसार झपाट्यानें

होतो. ती मुलें देवदत्ताला नुसती नावें ठेवूनच्च थाबली नाहींत, तर त्यानीं त्याला शिवावयाचें नाहीं असेंहि आपसात ठरविलें!

शाळेंत होणाऱ्या या जाचाचा देवदत्ताच्या कोवळ्या मनावर परिणाम झाल्यावाचून कसा राहील?

आपले नाव बदलण्याचा त्यानें अन्नपूर्णेजवळ हट्ट धरला तो यामुळे!

पण तो कसा पुरा करतां येईल हें बिचाऱ्या अन्नपूर्णेस काय माहीत? वर्गात आचरट 'विनोद' करणाऱ्या त्या मास्तराचा तिला मनस्वी संताप आला. पण ती अनाथ, गरीब स्त्री त्या मास्तराचें काय करूं शकणार होती? त्या मास्तराला मनातल्या मनात लाखोली वाहत स्वस्थ बसणें तिला भाग होतें.

गेले चार-सहा दिवस तिने देवदत्ताची कशीबशी मिनतवारीनें समजूत घातली होती. पण आज त्याचा पारा चागलाच चढलेला दिसत होता. तरीहि अन्नपूर्णेनें समजुतीच्या स्वरानें म्हटलें—

" अस काय बर वेड्यासारख करावं बाळ? एकदा ठेवलेल नांव कसं बरं बदलता येईल? तुझंहि नाव देवाचच आहे. देवदत्त, तूं देवानं दिलेला आहेस म्हणून तुझं नाव देवदत्त ठेविल आहे. ते काय वाईट आहे बरं?— "

" तें नांव ख्रिश्चन आहे." देवदत्त घुशानें म्हणाला, " बाटग्या म्हणून सारी मुल मला चिडवतात त्या नावामुळं—"

" अरे, तीं खुळी आहेत मुल."

" ह—आलीत खुळी! आणि मास्तर सुद्धां वाटत?—"

देवदत्ताच्या या खोचक प्रश्नाचे तसेंच निर्भीड उत्तर अन्नपूर्णेच्या अगदी ओठावर आले होतें; पण ती तें बोलू शकली नाही. शिवाय तिचें तें उत्तर देवदत्ताच्या बालबुद्धीस पटण्यासारखें नव्हतें. त्याच्या भावनापूर्ण बालहृदयाचे शकासमाधान तर्कनिष्ठ युक्तिवादाने करूं पाहणें म्हणजे फुलाच्या अंगी फत्तराचें काठिण्य शोधू पाहण्यासारखेंच खुळेपणाचें होतें. म्हणून तो विचार सोडून अन्नपूर्णा काहीशा अजीजीच्या स्वराने म्हणाली—

"अरे, मास्तर उगीच थट्टेनं म्हणाले असतील. मी उद्यां त्यांना नीट समजावून सांगेन अ. मग नाही कुणी तुला काही वाईटसाईट बोलणार. मग तर झाल ? चल तर आता जेवायला. रात बघ किती पडली ती— मी दिवा लावतें तोवर तू हातपाय धुऊन ये जेवायला हं."

असें म्हणून चालू प्रकार तेथेंच थांबविण्याच्या उद्देशाने अन्नपूर्णा तेथून उठली. तिने दिवा लावला व ती स्वैपाकाच्या तयारीस लागली. तापलेली काच आपोआपच थंड होईल अशा कल्पनेनें तिनें नंतर देवदत्ताशी काही अधिकउणा संवाद केला नाही. फक्त मध्यंतरी एकदा पावसाची सर आली तेव्हा तिनें खोलीत जाऊन देवदत्ताच्या अंगावर गरम पांघरूण घातले.

स्वैंपाक तयार झाल्यावर देवदत्तास हाक मारण्यासाठी अन्नपूर्णा पुन्हा खोलीत आली त्या वेळी रडून रडून देवदत्त झोपी गेला होता. पाकळ्या कुसकरलेल्या फुलासारखा त्याचा चेहरा निस्तेज दिसत होता. भरती निघून गेल्यावर अर्धवट वाळलेल्या वाळूवर ठिक-ठिकाणी पाण्याचे चरे उमटलेले दिसावेत तद्वत् देवदत्ताच्या गालावर

अश्रूंचे कोरडे वण पडून त्याचा चेहरा अधिकच कळाहीन दिसत होता. ते उद्वेगपूर्ण दृश्य पाहून अन्नपूर्णेला पराकाष्ठेचा खेद झाला.

तिनें देवदत्ताला हलके हलके हलवीत हाका मारण्यास सुरुवात केली—

" देयदत्ता, देवदत्ता जेवायला उठतोस ना ?"

देवदत्त जागा झाला. पण आईच्या तोडचें 'देवदत्त' हें नाव ऐकताच फुंकर मारलेल्या निखाऱ्यासारखा त्याचा राग पुन्हा प्रज्वलित झाला. तो रागाने उसळून म्हणाला—

" पुन्हा देवदत्त! मला नाही आवडत ते नाव म्हणून तुला इतक्यादा सांगितल, तरी तेच? मी नाही जा तुझ्याशी बोलणार. जा, मी जेवतहि नाही. आधी माझ नाव दुसर ठेव—"

असे म्हणून डोक्यावरून पांघरूण लपेटून घेऊन देवदत्त फुरंगटून निजला. अन्नपूर्णेला आपली चूक कळून आली. पण धनुष्यावरून सुटलेला बाण परत थोडाच येणार होता? तिला आपला स्वतःचा राग आला. तिने चिडून स्वतःलाच मनात चारदोन शिव्याहि हासडून घेतल्या.

देवदत्तानें जेवायला उठावें म्हणून नंतर तिने आपल्या प्रयत्नाची शिकस्त केली. पण त्याचा परिणाम इष्टसिद्धीच्या अगदी उलट झाला. देवदत्त शान्त होण्याऐवजी उलटा चिडला मात्र आणि रागानें लाल होऊन त्याने ताडकन् अन्नपूर्णेच्या हातावर एक जोराची लाथ मारली, आणि तो सोप्यावर अंधारातच उघड्या जमिनीवर जाऊन पडला.

देवदत्ताच्या लाथेनें अन्नपूर्णेच्या बांगड्या वाढवल्या गेल्या.

तिच्या डोळ्यातून अश्रुवर्षाव सुरू झाला! बाहेर पावसाची सरहि जोराने पडूं लागली होती!

अन्नपूर्णेचें विचारचक्र सुरू झालें—

देवदत्त—!

आणि हें नाव बदलण्याचा आपल्या लाडक्या पुत्राचा विचित्र हट्ट!

अन्नपूर्णेच्या मनापुढें अत्यत बिकट प्रश्न येऊन पडला होता.

देवदत्त– तिचा सारा सासारिक इतिहास, तिच्या अपत्य—वात्सल्याचा अवघा भाव-पट, तिच्या देवसदृश उपकारकर्त्या डॉक्टराची एकमेव इच्छा, या साऱ्या गोष्टी देवदत्त या एका नांवाशी स्मृतिबधानी घट्ट निगडित झाल्या होत्या. तिच्या स्मृतिबधनानी विणलेला इतक्या वर्षांचा हा हार्दिक जीवन-पट देवदत्ताचें नाव बदलून तोडून टाकण्यास तिची तयारी नव्हती, आणि तशी तिच्या अंगी शक्तिहि पण नव्हती.

एखाद्याचें नशीबच असे असतें, की पुष्कळ धनलाभ होऊनहि त्याच्या कपाळाचे दारिद्र्य काही चुकत नाही. तशीच काहीशी अवस्था अन्नपूर्णेची झाली होती. तिला अपत्यलाभ झाला त्याची मोजदाद करण्यास दोन्ही हाताचीं बोटेंहि अपुरीच पडतील, पण बिचारीचे दुर्दैव असें, की त्यापैकी एकानेहि आपला पहिला वाढदिवस साजरा करविण्याचें सौभाग्य आपल्या आईस लाभू दिलें नाहीं. अन्नपूर्णेनें अनेक नवस-सायास, देवधर्म, व्रतवैकल्यें वगैरे सारे बायकी उपाय करून पाहिले; पण रामा शिवा गोविंदा! त्यापैकीं एकाचाहि उपयोग न होतां तिची मुलें जन्मास आली तशींच तीं हातोहात स्वर्गलोकीं निघून गेली. बिचारी अन्नपूर्णा! प्रत्येक खेपेस तिनें पुत्रसौख्यलाभाची मनोराज्यें करीत प्रसूतिवेदनाचा पर्वत चढून जावें आणि अपत्यलाभाच्या

माथ्यावर पाय स्थिर झाला न झाला तोंच, मृत्यूच्या झंझावातानें तिला दुःखाच्या खोल दरींत निर्घृणतेनें फेकून द्यावें असा प्रकार दहा वेळेस घडून आला होता. बँकेच्या कॅशियरसारखीच तिची अवस्था होती. हजारों रुपये कॅशियरच्या हातांत असे येतात आणि असे जातात; पण त्यापैकीं एका पैवरहि त्याचें स्वामित्व नसतें! फक्त चोख हिशेबाची दगदग व पैशाच्या सुरक्षिततेची जोखीम याचा मात्र तो बिचारा धनी! तीच स्थिति अन्नपूर्णेची होती. ती फक्त प्रसूतीच्या कष्टाची तेवढी धनीण होती!

याच 'दुर्दैवाचे दशावतार' पाहिल्यामुळें अन्नपूर्णेचें अंतःकरण कमालीचें हळवें व भावप्रवण झाले होतें. अप्राप्य वस्तूविषयीं मनाला वाटणारी तृष्णा तिच्या बाबतींत दसपटीनें वाढली होती. आणि तिची इच्छा केवळ देवदयेनेच पुरी झाली होती.

अकराव्या खेपेस अन्नपूर्णा अपत्यवती होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं तेव्हा पूर्वीच्या अनुभवानें शहाण्या झालेल्या शंकररावांनी— अन्नपूर्णेचे पतिराज— तिला एका निष्णात गोऱ्या डॉक्टरला दाखविलें. त्याचा अभिप्राय असा पडला, की अन्नपूर्णेच्या काहीं शारीरिक विकृतीमुळे प्रसूतीच्या वेळीं अडथळा उत्पन्न होतो व म्हणून मूल जिवंत बाहेर यावयास हवें असेल तर ऑपरेशनखेरीज दुसरा कांही इलाज नाही.

आणि ऑपरेशनसंबधीं असलेल्या अज्ञानामुळे मनांत दृढावलेल्या विचित्र समजुती व तज्जन्य भीति, धर्मभावना, असल्या उपायाबाबत बायकांना नेहमीच वाटणारी लज्जा, गरिबीच्या संसारात या ऑपरेशन-मुळें येणाऱ्या खर्चाची आच, यांसारख्या मनश्चक्षूंसमोर उघड उघड दिसणाऱ्या अडचणीकडे पुत्रप्राप्तीच्या आशेनें अन्नपूर्णेने डोळयांवर

कातडे ओढून व मन कठोर करून दुर्लक्ष केले, आणि अग्निदिव्यांतून बाहेर पडलेल्या सीतेप्रमाणें ती या ऑपरेशनच्या दिव्यातून पार पडण्यास तयार झाली.

सीतेला तिचें पावित्र्य प्राप्त झालें तद्वत् अन्नपूर्णेला इतक्या दिवसाचें तिचें ईप्सित प्राप्त झालें.

तिला वाटले स्वर्गच आपल्या हाती आला!

तिच्या आनंदास आकाश ठेंगणें झालें असल्यास आश्चर्य कसलें?

मूल सुखरूप बाहेर आले, आणि तोहि मुलगा! यामुळे साहजिकच त्या गोऱ्या डॉक्टरास आनंद झाला. अन्नपूर्णेचा पूर्वेतिहास त्याला ठाऊक झाल्यामुळे तिच्याविषयी त्याला एक प्रकारची अनुकंपा उत्पन्न झाली होती. म्हणून तिची अपत्यलालसा आपल्या हातून पूर्ण झाली याचें त्याला मोठें समाधान वाटले. अन्नपूर्णा त्याच्या हॉस्पिटलमध्यें होती, तोंपर्यंत तो जातीनें तिची पूसतपास करून काळजी घेई. अशा या 'देवमाणसा'बद्दल अन्नपूर्णेला किती आदर व कृतज्ञता वाटत असेल याची कल्पना करणेच बरें!

अखेर अन्नपूर्णा हॉस्पिटल सोडून निघाली तेव्हा निरोप देताना तो गोरा डॉक्टर तिला व शंकररावांना उद्देशून म्हणाला—

" बाई, मुलाबद्दल आतां तुम्हाला कांही काळजी करण्याचं कारण नाही, तो खात्रीनं दीर्घायु होईल बर. देवानंच तुमची प्रार्थना ऐकून तुम्हाला हा मुलगा दिला आहे. म्हणून त्याचं नांव 'देवदत्त' ठेवा, देवदत्त."

आणि साहेबाची ही इच्छा त्या उभय पतिपत्नींनी कृतज्ञ अंतः-करणानें मान्यहि केली.

मुलाचें 'देवदत्त' हें ख्रिश्चन भासणारें नाव ठेवण्याच्या मागें असलेला हा इतिहास अन्नपूर्णेच्या नजरेसमोर पुन्हा प्रत्यक्ष घडत असल्याप्रमाणें दिसत होता. 'देवदत्त' या नावाशी निगडित असलेल्या या जिव्हाळ्याची साक्ष ती देवदत्ताच्या बालबुद्धीस कशी पटवूं शकणार होती? 'देवदत्त' या नावावर तिचे किती हार्दिक प्रेम होते हें देवदत्तास समजून सांगणें तिला किती अशक्य होते बरें! आणि म्हणूनच त्याचे 'देवदत्त' हे नांव बदलणेंहि तितकेंच अशक्य झाले नव्हतें काय?

तिच्या या हार्दिक स्मृतिमय भाव-पटाचें देवदत्ताच्या चिमुकल्या मनास काय होय? त्याला शाळेत मुलें नाना तऱ्हेनें चिडवीत होती त्याचें दुःख आईच्या या इतिहासापेक्षाहि त्याला जास्त वाटावे हें स्वाभाविकच होतें.

अन्नपूर्णेपुढें पेचाचा प्रश्न होता तो हाच!

आणि त्याचें समाधानकारक उत्तर मिळणें तिला तरी अशक्य वाटत होतें.

अन्नपूर्णेला आजच्या देवदत्ताच्या वागणुकीवरून आता निराळीच भीति वाटूं लागली होती. आपण त्याचें नाव बदलूं शकत नाही हें पाहून देवदत्त आपल्यावर रागावून आपणाशी बोलणे तर सोडून देणार नाही? त्याच्या बालहृदयात यामुळें प्रत्यक्ष आपल्या आईविषयी न कळत का होईना पण तिरस्काराचे, द्वेषाचे तर बी पेरले जाणार नाही? आणि—आणि मग?—कसली आई न् कसला मुलगा?...

या एकाच विचाराभोंवती तिचें मन आता घोटाळूं लागले. भावी काळाचें भेसूर चित्र तिच्या हळव्या मनाला घरे पाडीत होते. तिला ती कल्पनाहि असह्य झाली. ती ताडकन् उठली आणि हातीं दिवा घेऊन धावतच सोप्यावर गेली. रडण्याच्या श्रमानें व भुकेनें म्लान होऊन देवदत्त जमिनीवर उघड्यावर गाढ झोपी गेला होता. तो करुण देखावा पाहून अन्नपूर्णेचें हृदय विदीर्ण झालें. तिनें झटकन् देवदत्तास हलकेच उचलून मांडीवर घेतलें. त्याच्या अंगावर गरम शाल घातली; आणि त्या गंभीर शांततेंत त्या एकाच भयाण प्रश्नाचा आपल्या मनाशीच विचार करीत देवदत्ताच्या उदास चेहऱ्यावर आपली अश्रुभरित दृष्टि लावून अन्नपूर्णा बाह्यतः स्वस्थ बसून राहिली होती. पण– तिच्या अंतरंगाने मात्र लाक्षागृहासारखा पेट घेतला होता !

# आगीवांचून होणारा जाळ !

मी चंपावतीसह परत गांवी आलों तो या आशेने, की मध्यतरीच्या या दोन महिन्याच्या विरहाने घरातील वातावरण निवळलें असेल, निदान त्याची दाहक झळ तरी कमी झाली असेल. नाही म्हटलें तरी, आज तीस वर्षें मी आईच्या सतत सहवासात असल्यामुळे, तिच्या स्वभावाच्या थोरपणाची मला अनुभवाने पूर्ण जाणीव होती. तिच्या हृदयस्थ पुत्रवात्सल्यापुढे मध्यतरी उद्भवलेलें धुसफुशीचे धुकें फार वेळ टिकाव धरूं शकणार नाही अशी माझी कल्पना होतीच. त्यामुळें तिचें सुप्त वात्सल्य जागृत करण्यास माझा दोन महिन्याचा विरह पुरेसा आहे असें मला वाटले. आणि आज मी परत गावी आलों तो मनात मोठी आशा बाळगूनच आलो होतों, की विसकटलेली घडी आतां पुन्हा पूर्ववत् साफ बसली असेल.

मनाला किती उमेद वाटली म्हणतां या कल्पनेनें ! भावी सुखाची

मनोहर चित्रे मनाशी रेखाटण्यात मी प्रवासाचा सारा वेळ घालविला. एरवी चंपावती जवळ असताना तिच्याशी काही ना काही विषयावर बोलणे सुरू ठेवल्यावांचून मला पाच मिनिटे देखील स्वस्थ राहवत नसे. पण आजच्या सबंध प्रवासात चपावती शेजारी असून व मधून मधून माझें लक्ष वेधविण्यासाठी काही प्रश्न विचारीत असताहि माझें आज तिकडे लक्षच जात नव्हतें. आगगाडीच्या खिडकीशी बसून मी बाहेर पाहत होतों. सुगीचे दिवस असल्यामुळें जिकडे तिकडे शिवारें समृद्ध झालेली दिसत होती. सभोंवताली सृष्टि प्रसन्न होती. माझी अंत:सृष्टिहि प्रसन्न होती. या समानशीलपणामुळें माझें मन जणूं त्या प्रसन्न सृष्टीशी मूकपणें जिव्हाळ्याच्या गुजगोष्टी करण्यात गढून गेलें होतें. त्यामुळेंच शेजारीं बसलेल्या प्रिय पत्नीकडेहि माझे आज लक्षच जात नव्हते. समोरच्या सृष्टीप्रमाणेंच माझ्या घरचें वातावरणहि प्रमोदप्रसन्न व सुखसमृद्ध झाले आहे अशी कल्पनाचित्रें मी माझ्या मन:फलकावर मोहक रंगात रगवीत होतो.

या तीव्र उत्सुकतेमुळें केव्हा एकदा घरी जाऊन पोंचतों असें मला होऊन गेलें होते. घरातील साऱ्या परिचित खाणाखुणा व प्रिय वस्तु याचें सुखकारक दर्शन माझ्या मानसनेत्राना रिझवूं लागलें. दोन महिने मी या चिरपरिचित आपलेपणाच्या सुखाला आचवलों होतो. मी जेथें हे दोन महिने घालविले तेथें म्हणजे काहीं कशाची कमतरता होती असें मुळीच नव्हे. माझा खिसा नेहमी तुडुंब भरलेला असे. त्यामुळें कोणतेंहि भौतिक सुख मला पैशाच्या साहाय्याने मिळू शकत असे. पण या साऱ्या सुखाचा बाह्यात्कारी उपभोग घेत असता अंतरंगात कोठून तरी खोल विषादध्वनि निघे, की—

"आहे मनोहर परी गमते उदास!"

ही औदासीन्याची भावना या दोन महिन्यात माझ्या मनांतून केव्हाच गेली नाही. त्यामुळे चंपावतीला वाईट वाटूं नये म्हणून जरी मी वरकरणी आनंदी असल्याचें नाटक करी, तरी तिच्या भेदक दृष्टीतून माझ्या मनाची चलबिचल निसटूं शकली नाही आणि तसें कां न व्हावें ? खुद्द तिच्याहि मनाची जेथें माझ्यासारखीच अवस्था होती तेथें माझ्या भावनेचा सुगावा तिला लागावा यात काय नवल ? म्हणून तर अलीकडे पंधरा-तीन वार तिनें परत घरी चलण्याची भुणभूण माझ्यामागें लावली होती. परक्या प्रासादातील सुखापेक्षा सत्तेच्या खोपटातील दुःखच माणसाला मानवतें, नाही का ?

आणि मला तरी घर सोडून बाहेर राहणें कोठें आवडत होतें ? पण घरात राहणें अत्यंत कठीण होऊं लागले तेव्हा हा परग्रामवासाचा तोडगा मी काढला होता. माझी अपेक्षा होती, की महिना दोन महिने विरह झाला, की आईच्या स्वभावात आपोआपच पालट होईल. अभिमानाचा ताठा थोडा कमी होईल व नंतर गोष्टी पुन्हा पूर्ववत् सुखानें सुरळीत होऊं लागतील. आईचा स्वभाव मी पूर्ण ओळखून होतों. वळवाच्या पावसानें वाहून आणलेल्या मातीनें मूळच्या स्फटिकवत् जलाशयाला आणलेला मलीनपणा कधी कायम राहिला आहे का ?

मी तर मनाशी पक्के ठरवून ठेवलें होते, की मध्यंतरी जणूं काय काहीच झालें नाही असें समजून दोन वर्षांपूर्वीप्रमाणें आईशी वागावयाचें. चपावतीलाहि मधल्या अप्रिय वादळावर पडदा टाकून नाटकाच्या नव्या अंकाला सुरुवात करण्याबद्दल मी अनेक वेळा बजावून सांगितलें होतें. आणि तिला तरी घरांत माजलेली बजबजपुरी कोठें हवी होती ?

तेव्हा दोन महिन्यांनंतर आज आम्ही उभयतां फिरून घरी परत

येण्यास निघालो ते या नव्या निश्चयानें आणि उमद्या उत्साहानेच. विभागलेला संसार पुन्हा एकजिनसी करावयाचा असा आमचा बेत होता.

मनात ही उमेद ओसंडत असल्यामुळे घराचे दर्शन होताच माझ्या मनाला मनस्वी आनद झाला. रानात वाट चुकून भटकणाऱ्या पाडसाला अचानक धन्याचें मकाण दिसावे तसें मला झालें.

"प्रथम आईला नमस्कार कर हं." असे चपावतीला सागून दारात टागा थाबताच मी त्यातून उडीच टाकली. लगबगीने दार उघडून मी धावतच आत गेलों.

ओटीवरच आई जात्याशी काही दळण दळीत होती. जवळच शेजारच्या ताराक्का बसल्या होत्या.

मला पाहताच आईचा हात मध्येंच थाबला. बऱ्याचशा आश्चर्यानें तिनें डोळे विस्फारून माझ्याकडे पाहण्यास सुरुवात केली. तिच्या डोळ्यातल्या पाण्यात पुत्रभेटीचा आनदहि प्रकट होत होता, हें माझ्या सराईत दृष्टीनें लागलीच हेरले.

मी पादत्राण जवळ जवळ फेकूनच ओटीवर धाव घेतली व आईला मनोभावाने नमस्कार केला. मी जवळ आलेला पाहताच पीठ पडलेला लुगड्याचा भाग झाडून, आई उठून उभी राहिली आणि आता मला ती काही विचारणार इतक्यांत दरवाजाकडे तिची नजर गेली, आणि सारेंच गाडें उलटलें. चंपावतीला पाहताच तिच्या कपाळाला आठ्या पडल्या. तिच्या तोंडावर तिरस्काराची छटा दिसूं लागली, आणि ओठावर आलेला प्रश्न तेथेच विरला.

इतक्या अवधीत चंपावती ओटीवर आली होती. तिनें बायकाच्या पद्धतीप्रमाणें वाकून तीनदा नमस्कार केला. पण तो न घेतांच आई घरात निघून गेली.

चपावतीनें शेजारच्या ताराक्कानाहि तसाच नमस्कार केला. पण त्याहि एखाद्या दबा धरलेल्या नागिणीसारख्या फुसफुसत तिच्याकडे एक तीव्र दृष्टिपात टाकून घरात निघून गेल्या.

त्याच्या मागून माजघराचा दरवाजा आंतून लावून घेण्यात आला !

या अकल्पित घटनेने मी हतबुद्धच होऊन गेलो. माझें डोकें सुन्न झाले आणि डोळ्यापुढें क्षणैक अंधारी पसरली !

अत्यंत काळजीपूर्वक बनविलेली मोहक मूर्ति वाऱ्याच्या धक्क्याने कोसळून भंगून जावी म्हणजे शिल्पकाराला जें दुःख होतें तसें मला झालें.

मी चपावतीकडे पाहिले. ती खाली मान घालून अश्रु ढाळीत होती.

त्या विमनस्क स्थितीत किती वेळ गेला असता देव जाणे. पण टांगेवाल्याच्या "साहेब, पैसे देता ना?" या आरोळीनें मला भानावर आणले. मी पाहिले, टागेवाल्याने सारें सामान ओटीवर आणून ठेविले होते व तो भाड्याची अपेक्षा करीत उभा होता.

चटकन् पाकीट काढून मी त्याच्या हातावर अधेली टाकली. तो रामराम करून निघून गेला.

मीं सारें सामान माडीवर नेलें व चपावतीला वर हाक मारली.

आईशी भाडण होऊन आम्ही घरातल्या घरात वेगळा संसार माडला होता या माडीवर.

माडीवरच्या माझ्याकडे असलेल्या दोनहि खोल्यात सर्वत्र केर साचून राहिला होता. माजराने केलेली उलथापालथ आणि विसकटा-विसकट तशीच अस्ताव्यस्त पडलेली होती. एखाद्या बेवारशी धर्म-शाळेसारखी त्या दोनहि खोल्याची अवस्था झाली होती.

एकूण, मी बाहेरगावी गेल्या मुदतीत कोणी चिटपाखरूहि इकडे येऊन गेले नव्हते तर! माणसाच्या हालचालीचे काहीच चिन्ह त्या पसाऱ्यात मला आढळून आले नाही.

माझ्या संसाराची ती उध्वस्त स्थिति पाहून मला अतोनात खेद वाटला. मन कष्टी झालें. अंगांतला सारा उत्साह पार नाहीसा झाला.

हें माझ्या सत्तेचे घर होते! घरात माझ्या आईबापाचा नादता संसार खाली सुस्थितीत उभा होता. पण आईचे आणि चंपावतीचें पटेना म्हणून मी याच घराच्या माडीवर माडलेल्या वेगळ्या संसाराची अवस्था माझ्या गैरहजेरीत ही अशी झाली होती! मी किंवा चंपावती नसलों, तर उभारलेल्या ससाराची निगा घेण्यास आपलेपणानें कोणीहि तयार नव्हते, आणि तेहि माझी सख्खी आई खाली असताना!

कोण दारुण अवस्था ही!!

माझें डोके पिकून जाण्याची वेळ आली. आल्या पावली परत दुसरी-कडे कोठें तरी दूर जाऊन राहावें आणि फिरून या घरात पाऊलहि टाकूं नये असें मला वाटलें. भावनेच्या आवेगात मी वळलोंहि; पण वळताना कोणाचा तरी नाजूक धक्का मला लागला, आणि उचललेले पाऊल जागीच थबकले.

माझ्या हाताला हळूच स्पर्श करीत साश्रु नयनानी व रुद्ध कंठानें चंपावती हळुवार स्वरात म्हणाली—

“ हा प्रकार पाहून तुमच्या मनाला किती यातना होत असतील

तें मला कळतं. आणि हें सारं माझ्यामुळं तुम्हांला सहन करावं लागतं हा विचार मनात आला, की मला जीव नकोसा होऊन जातो... "

तिच्या डोळयांतून गळणाऱ्या टप् टप् अश्रूंनी तिची मनोव्यथा किती तीव्र होती याची मला साक्ष पटली. मी तिला समजावण्यासाठी तिचे दोन्ही हात हातात घेऊन ते किंचित् प्रेमाने दाबून म्हटलें—

" छे-छे, तू का उगाच मनाला लावून घेतेस ? या घरगुती भाडणात तुझ्याकडे काडीचीहि चूक नाही. याबद्दल मी नि बाबांनी अनेकवार खात्री करून घेतली आहे. आईच्या चुकीबद्दल तूं कां वाईट वाटून घेतेस ?... माझंच चुकलं. आपण इतक्यात परत यायला नको होतं...बरं, झाल तें झालं. आता आपणच काढूं हा पसारा. पुन्हा माडू संसार नीटनेटका— चल."

आम्ही एकमेकाच्या समाधानासाठी बाह्यात्कारी दुःख गिळून टाकण्याचें नाटक केले न् केरवारा, सामानाची व्यवस्था करण्याच्या उद्योगास लागलों. सामान आणल्यावर चंपावतीला चहा करण्यास सागितलें. तिनें स्टोव्ह पेटवला. नळाचे पाणीहि आणलें. पण दूध— ?

खाली आईकडे दूध मागायची सोय नव्हती. कारण अबोला !

अर्थात् चंपावतीला शेजारच्या आपल्या एका मैत्रिणीकडून दोन कपापुरतें दूध उसनें मागून आणावें लागले, तेव्हा चहाची सोय झाली एकदाची !

चहा घेतल्यावर मी माझ्या खोलीत येऊन आराम खुर्चीवर पडून राहिलों. काहीं तरी चाळा हवा म्हणून 'पासिंग शो' ओढण्यास सुरवात केली. मन फार बेचैन होतें. नाना विचारलहरी मनस्तटावर

सारख्या आपटून स्वास्थ्यभंग करीत होत्या. गेल्या वर्ष दीड वर्षातले काही काहीं प्रसग माझ्या मानसचक्षूपुढून जात होते.

या चित्रपटातील पहिला प्रसंग चंपावतीच्या व माझ्या लग्नाचाच होता. हें लग्न झाले ते माझ्या फारशा खुषीनें झालेले नव्हतें. माझी पहिली बायको वारल्यानतर लग्नच करावयाचें नाही असा मी निश्चय केला होता. आणि एक वर्षपर्यंत मी तो अत्यंत निग्रहानें पाळला-हि. पण हा निग्रह कायम टिकविणें दिवसेंदिवस मला कठीण जाऊ लागलें. कारण माझें लग्न होत नाही म्हणून आई झुरणीस लागली होती. जो कोणी येईल जाईल त्याला ती अगदी कळवळून सागे की, " माझ्या पोराच्या डोक्यातल एवढं लग्न न करण्याचं वेड घालवा हो कसहि करून! मी तुमचे उपकार जन्मजन्म विसरणार नाही." आईच्या या काकुळतीमुळें मला भीड घालणाऱ्या लोकाची संख्या वर्षाऋतूंतील ओढ्याप्रमाणे सारखी फुगतच गेली.

प्रथम प्रथम या लाटा मी चकविल्या. पण एकसारख्या उसळ-णाऱ्या लाटा दर्दी पोहणारा झाला, तरी किती काळ चुकविणार? शिवाय या आग्रहाच्या मागें आईचें जें करुण वात्सल्य होतें त्याचा प्रतिकार फार वेळ करणें मला शक्य नव्हते. कारण, आज जरी आईचें आणि माझें सूत नसले तरी, माझी आई हजारात एक स्त्री होती हें मी अभिमानानें सागतों. ती बुद्धिमान् होती, तितकीच प्रेमळहि होती. माझ्यावर तिचा अतोनात जीव, त्यामुळें तिच्या मनाविरुद्ध आपलाच हेका फार दिवस चालविणें मला शक्य नव्हते.

मी पुनः लग्नाला समति दिली तेव्हा आईला झालेला आनंद मी कधीहि विसरणार नाही. किती उत्साहानें तिनें नंतरची सारी कार्यें पार पाडलीं तें आठवलें म्हणजे आज मला आश्चर्य वाटते, की दोन

वर्षापूर्वीची आई आणि आजची आई या एकच का ? लग्न होऊन चंपावती घरी आली. तिचें आईने किती कौतुक केलें प्रथम प्रथम जणूं ती तिची पहिलीच सून होती !

माझें नशीब थोर म्हणून म्हणा, चंपावती फार सुस्वभावी मिळाली. माझी बायको म्हणून मी तिची स्तुति करतों असें नव्हे, तर तिचा चांगुलपणा गेले वर्षभर घरात जें वादळ सुरू होते त्यात चांगलाच कसास उतरला होता. आणि या अनुभवाने तर तिचा मला जास्तच अभिमान वाटत आहे.

सासू आणि सून दोघींहि सुस्वभावी असल्यामुळे पहिले पहिले काही दिवस घरात सुख आणि आनंद याची लयलूट होती. पहिल्या पत्नीची आठवण विसरून मीहि या नव्या संसारात रमून गेलों होतों. चंपावतीच्या आगमनाने घराला नवी शोभा आणि नवे जीवन लाभलें होतें.

पण सुखाची उष्णता जास्त झाल्यावर कलहाचा वर्षाव व्हावा असा ईश्वरी संकेत आहे की काय कोण जाणे ! नव्या संसाराची मधुर मजा चाखण्यात मी मशगुल असताना कलहाचा क्षारबिंदु सुखाच्या दुधात केव्हा पडला, मला कळलेंहि नाही. पण लग्न होऊन पांच-सहा महिने झाल्यावर, घरात काही थोडी धुसफुस सुरू असावी असा मला संशय येऊं लागला. कारण आताशा आताशा आई व चंपावती एकत्र बोलत, हसत बसलेल्या पहिल्यासारख्या क्वचित् दिसत. जेव्हा खालीं काही काम नसे तेव्हा चंपावती पूर्वीसारखी आईजवळ पोथी-पुराण वाचीत बसण्याऐवजी वर येऊन काही तरी पुस्तके वाचीत

बसलेली दृष्टीस पडे. स्वयंपाकघरांतहि आई तिच्याशीं पहिल्यासारखे मोकळेपणानें बोलण्यासवरण्याचें टाळीत आहे असेंहि मला अलीकडे दिसून आले होते.

काही तरी झालें होतें खास! पण ते काय होतें?

मीं चंपावतीला विचारून पाहिलें. पण तिने किंचित् खिन्न स्वरात उत्तर दिलें—

“ काही नाही विशेष. तुम्ही नका आमच्या बायकाच्या प्रकरणात लक्ष घालू. सार काही सरळ होईल आपोआप.”

पण चपावतीचा हा आशावाद फोल ठरला. औषध न मिळालेल्या खरजेप्रमाणे ही धुसफुस अधिकाधिक चिघळत गेली. आणि थोड्याच दिवसात स्वयंपाकघरातली मळमळ ओटीवर भाडणाच्या रूपानें बाहेर पडली.

त्या दिवशी काय झालें देव जाणे, पण आईनें चंपावतीवर शिव्या-चा वर्षाव केला. या माऱ्यापुढें भेदरून गेलेली बिचारी चपावती ओटीच्या एका खाबाला धरून निमूट अधोवदन उभी होती. आई हातवारे करून तिला काही तरी बोलत होती. पलीकडे शेजारच्या ताराक्का वाती करीत बसल्या होत्या.

या प्रकारानें मी स्तंभितच्च झालों. खाली जाऊन आईला ‘काय झालं?’ म्हणून विचारलें मात्र, तोंच माझ्यावर एकदम उसळून ती कडाडली—

“ तुझीच हिला फूस आहे मेल्या. आधींच शाळेत शिकलेली, त्यात बावळट नवऱ्याची फूस, मग कशाला बया सासूला भीक घालते आहे! बाई, बाई, बाई! अस्सा प्रकार आमच्या घरांत कध्धीं कध्धीं कुणी केला नव्हता.”

" अग पण आई, कसला प्रकार म्हणतेस तूं ? "

" मला काय विचारतोस ? आपल्या लाडक्या बायकोला विचार."

—आणि नंतरहि बराच वेळ आईचें तोंड सुरूच राहिलें. पण त्या साऱ्या बडबडीत चंपावतीचा अपराध काय होता हे काही बाहेर आलें नाही. मी चंपावतीला विचारून पाहिले, पण तिलाहि कांही माहिती नव्हती. तिनें एवढाच खुलासा केला की,—

" अलीकडे सासूबाई असला प्रकार वरचेवर करतात. आजचा प्रकार फार मोठा झाला इतकेंच."

" मग तूं आजवर का नाही मला बोललीस काही ?"

" तुमच्या मनाला उगाच कशाला त्रास हा ? बायकाचं हें असंच चालायच. त्यात शक्यतोंवर पुरुषानी नाही घालूं लक्ष."

वरकरणी चंपावती असें म्हणाली खरी, पण तिचा गळा आणि डोळे ही एकदम भरून आली. तेव्हा मी ताडले, की प्रकरण पुष्कळच दूरवर जाऊन पोचले आहे. चपा मला सागत नाही, पण तिला बराच त्रास पोचत असला पाहिजे असा मी तर्क केला.

या प्रकरणावर उपाययोजना काय करावी याचा मी विचार करीत होतों. माझ्या मनाचा काही निर्णय होण्यापूर्वीच घरातली भाडणें विकोपास गेली. या वादात माझी स्थिति फार चमत्कारिक झाली. आईचा पक्ष घ्यावा, की बायकोची बाजू घ्यावी हें कळेना आणि भांडणाचें कारण तर कोठेंच उमगेना. विस्तव तर कोठें दिसेना आणि धग तर कमी होईना !

मोठ्या विचित्र परिस्थितीत मी सापडलों होतों.

अखेर एकदा आईलाच समक्ष काय तें विचारायचें मी ठरविलें; आणि एके दिवशी ती खुषीत आल्याचें पाहून मी हळूच विषय काढला. पण चंपावतीचा उल्लेख येताच तिनें जे बोलणें बंद केलें तें अळीमिळी! या विषयावर माझ्याशी ती एक अवाक्षरहि बोलूं इच्छीत नव्हती, हें मला स्पष्ट कळून आलें.

तेव्हा मी बाबांना शरण गेलों. त्यानाहि घरात सुरू झालेल्या वादळाची जाणीव झालीच होती. पण शक्यतोवर ही बायकी धुसफूस परस्पर थांबावी अशी त्याची इच्छा असल्यामुळे ते आजवर या प्रकरणात पडले नव्हते. पण आग वाढतच चाललेली पाहून मीच त्याना ती विझविण्याबद्दल विनंति केली की,—

" आता तुम्ही तरी याचा काही शेवट लावा. आईचे आणि चंपाचे आता मुळीच पटत नाही. आई तर तिच्यावर शिव्याचा सारखा भडिमार करीत असते, कारण मात्र सागत नाही. मी चंपावतीलाहि विचारून पाहिल. पण तिच्याकडे तर काहीच चूक दिसत नाही. आता तुम्हीच या भाडणाचा निकाल लावा. चपाकडे चूक असली तर तिला, तुम्ही वडील आहात, हवी ती शिक्षा करा. आईकडे चूक असली तर काय करायचा बंदोबस्त तो तुम्ही करा. ती आई आहे, मला काहीं तिला सागताबोलता येत नाही."

माझ्या विनंतीवरून म्हणा, किंवा त्यानाहि या भाडणाचा वीट आला होता म्हणून म्हणा, बाबानी मनावर घेतले. त्यानीहि नानाप्रकारानीं आईला विचारून पाहिलें, पण आई काही धड उत्तर देईना. सामोपचारानें किंवा धाकदपटशानेंहि आईला बोलती करण्याच्या कामी बाबांना यश आलें नाही. आई चंपावतीच्या आगळिकीचा उच्चार करीना, पण बोलाचालीहि थाबवीना. उलट आमच्या समेट करण्याच्या

प्रयत्नामुळें जणूं आईला अधिकच अवसान आलें व ती पहिल्या-पेक्षाहि जास्तच जोरानें चंपावतीवर तुटून पडूं लागली. आणि त्यामुळें चागल्या सुखानें नादणाऱ्या घरात जिकडे तिकडे धुसफूस, रुसवा-फुगवा, भाडणतंटा याचेच साम्राज्य माजून राहिलें.

आमच्या घरासारखें सुखी व आनंदी घर नाही असा आजवर मला फार अभिमान असे. आणि वस्तुस्थितीहि तशीच होती. आईच्या आतापर्यंतच्या गृहिणीधर्मात तिळभरहि नाव ठेवण्यास जागा नसे. तिच्या प्रेमळ, उदार व अगत्यशील समजस स्वभावामुळे घरांत कधीं हेवादावा किंवा दुजाभाव याचे वारेंहि कुणास स्पर्श करूं शकलें नाही. पण तेथेंच आज कलहसाम्राज्यानंतरची स्मशानशातता वावरत असलेली पाहून माझ्या मनाला तीव्र दुःख झालें. आईसारख्या सुस्वभावी स्त्रीच्या स्वभावात अवघ्या तीन-चार महिन्यांच्या अवधीत येवढें पराकाष्ठेचें परिवर्तन होईल, अशी मला स्वप्नांतहि कधीं कल्पना शिवली नाही. पण म्हणतात ना, की सत्य हें केव्हा केव्हा कादंबरी-पेक्षाहि विलक्षण असतें म्हणून! त्याचा मला अलीकडे पुरेपूर अनुभव आला.

मीं पुष्कळ विचार केला. चंपावतीला खूप छेडून पाहिलें. आई-कडूनहि काही पत्ता लागतो का ते पाहण्यासाठी नाना युक्त्या योजिल्या. पण राम-शिवा-गोविंदा! कारणाचा मागमूस सापडेना. बाबानी तर आईला साष्टांग नमस्कार घातला; पण तिनें अबोला सोडला नाही. मोठीच चमत्कारिक परिस्थिति झाली होती!

एके दिवशीं माडीवरच्या खिडकीशीं मी उभा असता, खाली

ओटीवर शेजारच्या ताराक्का आईशी कांही कुजबूज करीत असलेल्या मला दिसल्या. माझे मन अलीकडे रात्रंदिवस एकाच विचारात गुरफटलेले असल्यामुळे मला एकाएकी एक चमत्कारिक शंका आली—

—या ताराक्काचा तर नसेल ना हा सारा आगलावेपणा ? हो, दुसऱ्याचें चागलें झालेलें न बघवणाऱ्या या विधवा बायका कोठें कशी आग लावतील याचा नेम काय सागावा !...

ही कल्पना आली मात्र आणि नंतर मला एकेक गोष्ट स्पष्ट दिसूं लागली. चंपावतीशी आईनें भांडण सुरू केले तेव्हांपासून दिवसेदिवस ताराक्काशी तिची घरांत सलगी फारच वाढत्या प्रमाणावर असल्याचें मला कळून आलें. स्वयंपाकघरात दोघीजणी बराच वेळ कुजबुजत बसलेल्याहि काही वेळा माझ्या दृष्टीस पडल्या होत्या. या साऱ्या बनावाचा अर्थ आज माझ्या ध्यानी आला. मला मोठा आनद झाला. घरांतलें वादळ शात करणे सोपें जाईल असें वाटून मी त्याच दिवशी संध्याकाळी, ताराक्का आमच्या नळावर पाणी भरण्यास आल्या असताना, त्याना पुन्हा आमच्या घरात पाऊल न टाकण्याबद्दल स्पष्ट बजावले.

पण माझ्या या कृतीचा परिणाम माझ्या अपेक्षेच्या अगदी उलट झाला. चंपावतीनेंच मला सागून ताराक्काना घरी यायला बंदी केली असा आईने ग्रह करून घेतला आणि—

" माझ्या घरात माझ्या माणसाना बंदी करण्यापर्यंत हिची मजल गेली. आता माझी म्हातारीची धडगत नाही. ही घडोघडी असा माझा अपमान करील. त्यापेक्षां तिला वेगळी काढा नि ती अन् तिचा नवरा स्वतंत्र संसार करूं देत. त्यांना आपल्या वाटण्या करून द्या इस्टेटीच्या. त्याशिवाय मी अन्न घेणार नाही." असा विलक्षण त्रागा तिनें सुरू केला. मीं व बाबानीं तिला नीट समजावण्याचा खूप प्रयत्न

केला, पण पालथ्या घड्यावर पाणी ! तिचा हेका काहीं सुटेना व ती अन्नहि घेईना !

आईचे कांहीं नातेवाईक मध्यस्थी घालून हें प्रकरण मिटविण्याचाहि प्रयत्न करण्यात आला. पण तिच्या मनानें काय घेतलें होतें कोण जाणे ! ती आपला वाटण्या करण्याचा हट्ट काही सोडीना.

अखेर तिच्या समजुतीसाठी म्हणून बाबांनी तिच्या नावावर बॅकेंत काही पैसे ठेवले व मी घरातल्या घरात माडीवर वेगळे बिऱ्हाड केलें. खाली आईचा संसार निराळा, व वर माझा वेगळा ससार अशीं एकाच घरात दोन बिऱ्हाडें झाली— एकत्र कुटुंबाच्या गृहसौख्याची शकलें झाली ! त्या दिवसापासून आईनें माझ्याशी व चंपावतीशी समक्ष बोलणें अजीबात सोडून दिलें.

एकाच घरात नादणाऱ्या चार माणसाची तोंडें चार दिशाना झाली !

मला व चंपावतीला या गोष्टीचा अतिशय खेद वाटला. आपल्यासाठीं आपल्या नवऱ्याला मातृप्रेमाला मुकून या विचित्र परिस्थितीला बळी पडावें लागलें, या कल्पनेनें चंपावतीच्या डोळ्याचें पाणी खळेना. मलाहि या वेगळ्या बिऱ्हाडात काही जीव वाटेना. मनाची टोंचणी तर होतीच. पण बारीक-सारीक गोष्टीतहि अतिशय त्रासदायक परिस्थिति उत्पन्न होऊं लागली. खालून एखादा जिन्नस आणावयाचा झाला, तर गड्याकडून आणवावा लागे. आणि एखादे वेळेस गडी कोठें बाहेर गेलेला असला, तर यत्किंचित् गोष्टीसाठीं अडून राहण्याचा प्रसंग येई. बायकोकडचे कोणी पाहुणे आले, तर आईसाहेबाच्या

तोंडाचा पट्टा खालीं सुरू होई व मग वर मला व चपावतीला कसेसेंच होऊन जाई. घरात सुख आणि आनंद याचा पूर्ण अत झाला.

गेल्या वर्षाच्या दिवाळीची आठवण तर मी कधीच विसरूं शकणार नाहीं. चपावतीला जेव्हा दिवाळीसाठी माहेरचें बोलावणे आले, तेव्हां ती जाण्यास मुळीच तयार नव्हती. तिचे म्हणणे पडलें की,—

"मी माहेरी गेल्यावर इकडे तुमचे फार हाल होतील. तुम्हांला खानावळीतलं जेवण आवडत नाही. आणि खाली जेवायलाहि तुम्ही जाणार नाही. अशा स्थितींत मी माहेरी जाऊन राहिल्यावर तुमच्या जेवणाची काय सोय?"

"तुझं म्हणणं थोडंसं खरं आहे. पण माहेरच्यानी इतक्या आग्रहानं बोलावलंय् तर तूं जावंस हें बरं. मला भात-पिठलं करता येतं. ते करून मीं कसं तरी भागवीन. फार तर तू सहा-सात दिवसाच्या पोळ्या करून ठेव नि जा म्हणजे झालं."

माझ्या आग्रहावरून अखेर चंपा या योजनेला कबूल झाली.

आणि तो दिवाळीचा मंगल सण मी त्या शिळया पोळया दुधात भिजवून खाऊन काढला!

तेव्हा माझ्या मनाला ज्या यातना झाल्या असतील त्याची कल्पनाच करावी हें बरे. माझें सत्तेचे घर आणि माझ्या आईबापाचा नादता ससार खालच्या मजल्यावर असताना व त्या संसारात दिवाळी-च्या सणानिमित्त रोज निरनिराळया पक्वानाचें भोजन होत असताना मी मात्र माडीवर बसून शिळ्या व वाळक्या पोळ्यांवर भूक शमविण्याचा कसा तरी प्रयत्न करीत आहे, ही स्थिति किती हृदय-भेदक आहे! लहानपणापासून मी संपन्नावस्थेंत वाढलों असल्यामुळें व

आजपर्यंत पैशाची मला कधीच ददात पडलेली नसल्यामुळें तें तसले घाणेरडें अन्न जाता जात नसे. पण करणार काय ?

ती दिवाळी मी तशीच काढली. हेतु हा, की आईच्या मनावर त्याचा इष्ट तो परिणाम व्हावा. कारण माझी पक्की खात्री होती, की माझे असे झालेले हाल तिला बघवणार नाहीत. स्वभावतः ती चागलीच होती. तसा तिच्यात दोष असा नव्हताच. पण अलीकडे तिच्या मनात काय भरले, किंवा भरविलें गेलें होतें देव जाणे ! तिची वागणूक अत्यंत तऱ्हेवाईक झाली होती व त्यामुळें आमच्या घरातला आनंद पार कोठें पळाला होता. जिकडे तिकडे अभिमानाचा ताठा, एक-मेकाशीं अबोला, बोलाचाली व रडारडी याचीच धामधूम माजून राहिली होती !

या परिस्थितीवर तोडगा म्हणूनच मी दिवाळीसारख्या मोठ्या सणात कदान्न खाऊन राहण्याचा प्रयोग केला होता. त्याचा थोडासा उपयोग झाला. आईचा खरा राग माझ्यापेक्षा माझ्या बायकोवरच होता, त्यामुळें माझ्याबद्दलच्या तिच्या वात्सल्यभावात फारसा फरक पडला नव्हता. खाली केलेले गोड-धोड पदार्थ ती बाबांच्या करवी वर माझ्याकडे पाठवी. पण आईनें अबोला सोडून पूर्ववत् दिलसफाई केल्याखेरीज खालच्या अन्नाला स्पर्शहि करावयाचा नाही असा माझा निश्चय कळवून मी ते पदार्थ जसेच्या तसें परत करी.

ती दिवाळी तशीच गेली. पण आईच्या वागणुकीत काही फरक पडला नाहीं ! आणि चंपावती परत आल्यावर तर तो पडण्याची कांहीच आशा उरली नाही. तेव्हां आता हें घरगुती खडाष्टक मिट-

विण्यास काय उपाय योजावा या विचारात मी असता मला ग्रामां-तराची कल्पना सुचली. कांहीं दिवस दूर कोठे तरी जाऊन राहिल्यानें हा आगीवाचून होत असलेला जाळ शमेल अशी आशा मला वाटत होती, म्हणून ती कल्पना मी चंपावतीस सांगितली. हा वाद थांबविण्यासाठी हवें तें करण्यास तिची केव्हाहि तयारी होतीच. तेव्हा बाबाच्या कानावर हा बेत घालून आम्ही उभयतानी एक दिवस घर सोडले—

आणि दोन महिने बाहेर गावी घालविल्यावर मोठ्या आशेनें आणि नव्या उमेदीनें मी घरी परत आलों होतों. पण, दारात पाऊल टाकताच माझें सारें सुखद मनोराज्य कोसळून पडलें. आईची विचित्र वागणूक कायमच होती. पण, तिच्या बुडाशी असलेलें कारण मात्र कोणालाच उमगेना !

जाळ दिसत होता, पण आगीचा पत्ता लागत नव्हता ! !

३ ]

# पुतळ्यांची माळ

संध्याकाळ होऊन गेली होती. सूर्य केव्हांच अस्तगिरीच्या आड झाला होता. आणि त्याचा संधिप्रकाशहि ढगाऱ्या आड लोपला होता. आता अंधकाराच्या साम्राज्यास सुरुवात झाली होती.

भागीने आपल्या झोंपडीचे दार अर्धवट उघडून दूरवर नजर फेकली.

बाहेर पाऊस झिम् झिम् पडत होता. रस्ता चिखलानें भरलेला दिसत होता. अशा वेळी घराची ऊबदार हवा टाकून बाहेर कोण पडणार ! क्वचित् एखादी मोटार सभोंवार चिखलाचे फवारे उडवीत जाताना दिसे. लांडग्याच्या नुसत्या आरोळीनें देखील मेंढरें कोंडवाड्या-कडे पळावींत तद्वत् लांबून येणाऱ्या मोटारीचा आवाज ऐकूनच चिख-लानें लडबडलेल्या त्या रस्त्यानें जाणारी पादचारी माणसें पदवीथीकडे धाव घेत होतीं.

पावसानें फार दूरवरचें स्पष्ट दिसत नव्हतें. भागीनें आणखी एकवार आपले डोळे शक्य तितके विस्तारून रस्त्याची टेहळणी केली; पण तिच्या चेहऱ्यावर उमटलेल्या निराशेच्या छटेने तिची अपेक्षा निष्फळ झाल्याचें दिसून आले. " हा आतां येणार तरी केव्हा ? " असे काहीसे त्रासाचे व निराशेचे उद्गार आपल्याशींच पुटपुटून तिनें उघडलेलें दार किंचित् जोरानेंच ढकललें व ती आपल्या कामास लागली.

झाडावरचा मोहोर पाहून आगामी फळाच्या मोसमाची कल्पना येते तद्वत् भागीच्या खोपटाकडे नजर टाकताच तिच्या गृहस्थितीची कल्पना तेव्हाच येते. त्या खोपटात मूर्तिमंत दैन्य नांदत होतें. चार मातीचीं गाडगी-मडकीं, काहीं फाटकी, जीर्ण व मळकीं कापडें, जळणासाठीं वेंचून आणलेल्या काटक्या या व्यतिरिक्त फारसें 'सामान' झोंपडींत दिसत नव्हतें. पाऊस आल्यामुळें घराबाहेर लावलेल्या गोवऱ्याचा पसाराहि नुकताच आत आणून टाकलेला होता. एका कोपऱ्यात घासलेटची चिमणी ढणढणा जळत होती. शेजारींच मातीची पेटलेली चूल असून तिच्यावर भाकरी बडविण्याचें काम सुरू असल्याचें दिसत होतें.

दार ढकलून भागी आली व चुलीशीं पुन्हा भाकरी करण्यासाठीं पीठ मळूं लागली. पण तिचें सारें लक्ष मात्र दाराकडे लागलें होतें. चाहूल लागल्याचा भास होऊन ती वरचेवर कानोसा घेई. पण तिचा इच्छित पदरव ऐकूं येण्याऐवजीं गटारातून जोरानें वाहणाऱ्या पाण्यावर झोंपडीच्या वळचणींतून पडणाऱ्या पाण्याचा आवाज मात्र तिच्या कानीं येई ! दूरवर बेडकाचें ओरडणें ऐकूं येई. आसपासच्या झाडावरील पक्षी पावसाचें अंगावर पडलेलें पाणी झाडून टाकण्यासाठीं पंख झाडीत त्याचा फडफड असा आवाज कानीं येऊन तिच्या हृदयांत भीतीचा तरंग उठे व त्यामुळें तिचें अंग शहारून जाई.

भागी तव्यावरील भाकरीला पाणी लावून मोडक्या उलथण्यानें ती परतविण्याच्या उद्योगात असता खोपटाचा दरवाजा धाडकन् उघडला गेला आणि झुकाड्या खातच भिकू आंत आला. पावसातून भिजून आल्यामुळें झाडावरून पावसाचे थेंब गळावेत, तद्वत् त्याच्या अंगावरून पाण्याचे थेंब गळत होते. त्याच्या डोक्याला काहीहि नव्हतें. अंगातलें कुडतें उजव्या दंडावर फाटलेलें दिसत होतें. जाकिटाची बटनें लाविलेलीं नसल्यामुळें त्याच्या दोन्ही बाजू, हत्तीच्या डुलण्याबरोबर वरच्या झुलीचीं खालीं लोंबणारी शेपटेंहि हलतात तद्वत् भिकूबरोबर झुकाड्या खात होत्या. त्याचा तोल क्षणोक्षणीं जात असल्यामुळें त्याला धड उभेंहि राहता येत नव्हतें.

तो देखावा पाहताच तव्यावरून अर्धवट उचललेली भाकरी भागीच्या हातून गळून पडली. चुलींतील फुरफुरणाऱ्या ज्वालाप्रमाणें तिच्या डोळ्यातून क्रोधाच्या ज्वाळा निघू लागल्या. कशाची तरी घाण आल्यामुळें तिला शिसारी आल्यासारखें झालें. नाकाला लुगड्याचा पदर लावून व अंग तिरस्कारानें झटकून ती भिकूच्या अंगावर वसकन् ओरडली—

“ हात् मेल्या, प्यायलास का पुन्हा ? तुला आता करूं तरी काय ? पोटात आग पडली कीं काय तुझ्या ? सारखा मेला दारू ढोसतोय...”

भागीचा हा तोंडाळ हल्ला आणखी बराच लांबला असता. पण तो लांबूं देण्यास भिकूची तयारी नव्हती. बायकोनें आपल्या तोंडावर आपली अशी निर्भर्त्सना करावी ही गोष्ट भिकूला सहन होणें शक्य नव्हतें. भागीच्या प्रत्येक शब्दाला शब्द देण्याचा, इतकेंच काय पण लाथाबुक्क्याचा अहेर देण्याचाहि त्याला आजवर चांगलाच सराव झालेला होता. त्यांतून आता तर तो बेवडा पिऊन तर्र होऊन

आलेला होता. मग त्याच्या मर्कट लीलांना ऊत यावा यांत काय आश्चर्य?

"हो, हो, रांडे, मी–मी दा–दारू ढोसतों. रो–ज रोज पितों." भिकूचे शब्दोच्चारहि नीट होत नव्हते. त्याच्या शरीराप्रमाणें त्याचे शब्दोच्चारहि कंप पावत होते. सोडा वॉटरची बाटली फोडताच तीतून फेस फसफसून बाहेर यावा त्याप्रमाणे बोलण्यासाठी भिकूनें तोंड उघडलें की त्यांतून दारूची दुर्गंधि वसकन् बाहेर पडत होती. "तु–तु तुझ्या बाचं का–काय जातं?......"

आपल्या दारुड्या नवऱ्याने दारूच्या निशेंत आपल्या आईबापाचा उद्धार केला तरी तो निमूटपणें ऐकून घेण्याला व आपल्या प्राक्तनाला दोष देत स्वतःशीच मुळूमुळू रडत बसण्याला भागी पाढरपेशी थोडीच होती? नवरा दारू पिऊन आलेला पाहून आधीच तिच्या अंगाची आग झाली होती. तशात दारूच्या निशेंत त्यानें आपल्या आईबापावरहि तोंड टाकलेलें ऐकून तिचा राग अनावर झाला. तिनें ताडकन् उठून भिकूच्या फाडकन् श्रीमुखात दिली! फिडलेला खाच एकाच घावासरशीं जमिनीवर कोसळावा तद्वत् आधीच दारूनें झिंगलेला भिकूचा देह भागीच्या एकाच थपडेनें जमीनदोस्त झाला. डिवचलेली नागीण फुसकारीत असावी तद्वत् भागी भिकूकडे रागानें पाहत उभी राहिली. तिचे ओठ थरथर कापत होते.

भागीच्या या कृतीनें भिकूची निशा बरीच उतरली. आपल्या बायकोनें आज दाखविलेल्या या महिषासुरमर्दिनीच्या अवतारानें क्षणमात्र तो गांगरला. ससा म्हणून धरायला जावें आणि तो वाघ

निघावा, तशीच त्याची अवस्था झाली. इंगळाप्रमाणें लाल झालेल्या भागीच्या डोळ्यास डोळा भिडविण्याचे साहस भिकूला करवेना.

पण भिकूची ही भीति फार वेळ टिकली नाहीं. वळीव उघडतांच ओढ्याला आलेले अंगातुक पाणी ओसरून जावें तद्वत् त्याचे पौरुष जागें होताच त्याच्या मनातील भीति नाहीशी झाली. कांहीं वेळानें झालेली घटना त्याच्या ध्यानात आली आणि स्वतःच्या बायकोनें केलेल्या या दारुण अपमानाची कल्पना येताच तो पडल्या जागेवरून ताडकन् उठून भागीकडे रोखून पाहत उभा राहिला.

"मला मारतेस, राडे? थाब. तुझं हाड न् हाड सैल करतों. मी दारू पितों म्हणून मारतेस काय? मी दारू पितों तर तुझ्या बाचं काय जातं? मला मारतेस? दारू पितों म्हणून मारतेस?..."

"हो, हो, दारू पितोस म्हणून मारतें." भागीहि पुन्हा उसळून म्हणाली, "आतां पुन्हा दारू पिऊन ये तरी. तुझी पाठच सडकतें मेल्या. घरादाराची राखरागोळी केलीस तरी दारू पितोस अजून?..."

"हो, हो, पितों. मी दारू पितों." भिकू छातीवर हात ठेवून म्हणाला, "तुझ्यासारख्या बाइलेला भिणारा हा मर्द नव्हे, समजलीस? आणखी पिणार मी दारू. आणखी बेवडा अच्छेर पितों. तूं काय करतीस तें बघतों."

"जा, जा मेल्या. पी अन् मर जा." जवळच्या शेणीचे चार तुकडे रागानें त्याच्या अंगावर फेकून भागी ओरडली.

"हें बघ मला आज मिळालेले पैसे. इतक्या सगळ्या पैशाची दारू पितों थाब."

असें म्हणून भिकूनें आपल्या जाकिटाच्या एका खिशात हात घातला. दुसरा खिसा तपासला. तिसराहि चाचपला. सारे खिसे

त्याने पुनः पुन्हा तपासून पाहिले, पण व्यर्थ. आज मिळालेला त्याचा रोजमुरा वाटेवरील कलालाच्या खिशात जाऊन बसलेला होता ! तो भिकूच्या खिशात कसा सापडावा ? आपल्या पिलासाठी चोचीत घास घेऊन आलेल्या पक्षिणीस घरट्यातील पिलें नाहीशीं झालेली दिसावीत म्हणजे तिची जी अवस्था होईल तशीच खिशात अपेक्षित पैसे न मिळाल्यामुळे भिकूची स्थिति झाली. तो संतापला आणि रागानें ओरडला—

" भागे, मुकाट्यान माझे पैसे दे. नाही तर पहा. माझ्याशी गाठ आहे. "

" तुझे पैसे ? कुठले तुझे पैसे ? मला नाय ठाव तुझे पैसे-बिसे." भागीनें फणकाऱ्याने उत्तर दिलें व ती भडकलेला जाळ कमी करण्यासाठी चुलखडाकडे गेली.

" खोटं बोलतेस राडे ? बऱ्या बोलानं माझे पैसे दे. तूच ते घेतलेस माझ्या खिशांतून काढून ! " तिच्या पाठोपाठ दोन पावले जाऊन भिकू म्हणाला.

" कुणी मीं ?" भिकूकडे वळून भागी खेकसली. त्यामुळे भिकूचें पुढें पडणारे पाऊल जागच्या जागीच थबकलें.

" हो, हो तूंच." भिकू हातवारे करीत म्हणाला, " मी दारू पितों म्हणून तूंच माझ्या खिशातून पैसे काढून घेतलेस. माझ्या पैशाची मी दारू पितो त्यात तुझ्या बाच काय जात ? दे, माझे पैसे मला. त्याची मी आणखी दारू पिणार–दे."

आणि पैसे घेण्यासाठी भिकू दोन पावले पुढें झाला. भागीला असला प्रसंग नवीन नसल्यामुळें भिकूच्या बडबडीकडे दुर्लक्ष करण्याचें ठरवून ती आपल्या भाकरी करण्याच्या कामास लागली. पण भिकोबा

कोठले गप्प बसायला? बायकोच्या नाकावर टिचून त्याला आणखी दारू प्यायची होती. त्यामुळे भागीच्या या अबोल उपेक्षेनें त्याला आपला अपमान झालासें वाटलें. तीव्र संतापाने त्यानें एकदम आपल्या बायकोवर वाघाप्रमाणें झेप घातली व म्हटले—

"देतेस का नाहीस माझे पैसे? मी दारू पीन नाही तर विष पीन. तू कोण मला अटकाव करणार? अं?"

अंगावर पडलेली घाण झटकून टाकावी तद्वत् भागीनें भिकूचा आपल्या गळयावरील हात दूर झटकला व तिरस्कारानें म्हटले—

"जा, वीषच पी जा मेल्या अन् जा मरून, म्हणजे सुटलास एकदाचा. मीहि सुटेन तुझ्या या छळांतून."

तिच्या स्वरात भिकूबद्दलचा तिटकारा पुरेपूर भरला होता. पण तिच्या डोळयात मात्र पाणी आलेलें दिसत होतें!

"हो, हो विषच पिणार. काढ माझे पैसे. तूं काय समजलीस?" भिकोबा गरजले.

"कुठले पैसे? माझ्याजवळ नाहीत पैसे."

"खोट बोलतेस? तुझ्याजवळ आहेत पैसे. दे ते मला दारूला. मला दारूला पैसा देत नाही अन् आपण गळयात सोन्याच्या पुतळया घालून मिरवती बया. थाब, त्या तुझ्या पुतळयाच देतों आज दारूला—"

पाण्यातील मासा पकडण्यासाठी खंड्या पक्षी जशी झडप घालतो तद्वत् भिकूनें भागीच्याकडे झेप टाकली व तिच्या गळयातील पुतळयाच्या माळेस त्यानें हात घातला. हा अत्याचार मात्र भागी सहन करूं शकली नाही. तिनें शक्य तितका जोर करून भिकूला दोन्ही हातानीं दूर ढकलून दिलें. दारूचा अंमल अजूनहि भिकूवर बराचसा असल्या

मुळें तो भागीच्या धक्क्यानें जमिनीवर कोसळला. पण या झटापटीत भागीच्या गळयातील पुतळयाची माळ मात्र तुटून पडली.

एखाद्या परम भाविकाची नित्य पूजनाची मूर्ति अचानक भग पावलेली पाहून त्याला जसें दुःख होईल तसलेंच दुःख ती पुतळ्याची माळ तुटल्यानें भागीला झाले. एखाद्या अत्यत दुर्मिळ वस्तू-प्रमाणें तिनें तिचें आजवर जिवापाड जतन केले होते. आईचें आपल्या अपत्यावर नसेल इतकें तिचें त्या माळेवर ममत्व जडलें होते. त्यामुळे माळ तुटलेली पाहताच तिच्या हृदयाचा बाध फुटून तो डोळयावाटे जोरानें वाहूं लागला. तिच्या मनश्चक्षूंसमोर फार वर्षांपूर्वीचे एक दृश्य उभे राहिलें.

—त्या वेळीं भागी सारी दहा-अकरा वर्षांची होती. तिचें नुकतेंच लग्न झालें होतें. तिच्या लग्नानंतर लौकरच तिची आई वारली. मरणा-पूर्वी एके दिवशी तिनें आपल्या मुलीला आपल्या अगदी जवळ घेऊन व तिच्या पाठीवरून आपला कृश व सुरकुतलेला हात प्रेमळपणें फिरवून म्हटलें, " भागे, आता या आजारातून मी काही खास जगत नाहीं. पण मरणापूर्वी मी तुला एक जिन्नस देणार आहें. ती तू अगदी जिवा-पाड जतन केली पाहिजेस. आपल्या कुलदैवताचा प्रसाद म्हणून आज कित्येक पिढ्या ती आमच्या घरात आहे. मरेपर्यंत जतन करून मर-ताना ती आपल्या आवडीच्या माणसाच्या स्वाधीन करावयाची असा रिवाज आहे. मला ती माझ्या आईनं दिली. आता माझ्या माघारी तिचा साभाळ तूं करावास. करशील ना ? "

म्हातारीचा सगद्गद आवाज इतका करुणाजनक होता, कीं आपण

काय करतों आहोंत याचा तिचा तिलाच नीट उमज पडण्यापूर्वी भागीनें म्हातारीला होकारहि देऊन टाकला.

भागीच्या या आश्वासनानें म्हातारीला पुष्कळच आनंद झाल्याचें तिच्या चेहऱ्यावरून दिसून आलें. तिनें थोड्याशा कष्टानेंच आपल्या गळ्यातील पुतळ्याची माळ काढून ती स्वहस्तें भागीच्या गळ्यात घालून म्हटलें, "भागे, ही माळ तुझ्या गळ्यात घातली आहे. आता ती कुठल्याहि कारणासाठी तूं गळ्यातून काढता कामा नये; तसं तूं केलंस तर आपल्या कुलदेवाचा तुजवर कोप होईल. तो तुझा छळ करील; म्हणून बजावून ठेवते, कीं तूं ही माळ गळ्यातून काढता कामा नये."

आणि म्हातारीची ही आज्ञा भागीनें स्वामिनिष्ठ चाकराप्रमाणें आजपर्यंत अक्षरशः पाळली होती. आपण ज्या माळेचे जिवापलीकडे जतन केलें ती माळ आपल्या नवऱ्यानें दारूच्या धुंदीत बेगुमानपणें तोडलेली पाहून तिचें हृदय पिळवटून निघालें. शोकाच्या कृष्णमेघानी तिचे मानसाकाश भरून गेले व त्यात भिकूविषयींच्या तिरस्काराच्या, क्रोधाच्या विजा चमकूं लागल्या. तिच्या आक्रोशाचे गडगडणें सुरू होऊन डोळ्यावाटे जलवृष्टीहि होऊ लागली.

परंतु भागीच्या या स्थितीकडे लक्ष देण्याइतकें भिकूचें मन आज ठिकाणावर नव्हते. आपल्या 'पानक्रिये'बद्दल आपली निर्भर्त्सना करणाऱ्या बायकोला आज चागलाच धडा द्यावयाचा असा त्यानें दृढनिश्चय केला होता. आणि ह्या निर्भर्त्सनेच्या आगीत दारूसाठी पैसे द्यावयाचें नाकारून भागीनें तेल ओतण्याचा गुन्हा केला आहे असें भिकूला वाटलें. त्यांत आणखी आतां त्याला ढकलून तिनें जमिनी-

वर पाडल्यामुळें वणव्याला वारा भेटावा तसें भिकूच्या रागाचें झाले. स्वतःचा तोल सभाळीत तो उठला. भागीकडे क्रुद्ध नजरेनें पाहत खाली पडलेल्या त्या पुतळयाच्या रोखानें तो जाऊं लागला.

डूक धरलेल्या माणसाचा आवाज नागीण तेंव्हाच ओळखते, तद्वत् पुतळयांच्या रोखानें जाणाऱ्या भिकूचा उद्देश भागीने तत्क्षणीच ओळखला आणि शिकारी कुत्रा आपल्या सावजावर झडप घालतो त्या तत्परतेनें तिनें त्या पुतळया झरकन् गोळा करून आपल्या उराशी धरल्या.

आपल्या अगदी तोंडात शिरणारा घास काढून घेणारावर सिंह चवताळतो तसा भिकू भागीवर खवळला. तो रागाने दात ओठ खात ओरडला—

" * * * ... त्या पुतळया मुकाट्यान मला दे. नाही तर तुला ठा...ठार मारीन. सोडणार नाही. दे ! पुतळया दे."

" मार बघूं कसा ठार मारतोस तो !" भागीलाहि आता मनस्वी त्वेष चढला. घराच्या एका भागाला आग लागल्यावर दुसरा भाग किती वेळ सुरक्षित राहणार ? ती ताडकन् भिकूपुढे जाऊन छातीठोक उभी राहिली. रागानें तिचा श्वासोच्छ्वास जोरानें होत होता व त्या-बरोबरच तिचें वक्षःस्थलहि जोरानें खालीवर होत होतें.

तिची ती अनपेक्षित धिटाई पाहून भिकू प्रथम थोडा बावरला. त्याला न कळतच त्याचें एक पाऊल मागे पडलें. तो थोड्या नरमाई-च्या स्वरानें म्हणाला—

" तेवढ्या पुतळया कर ना माझ्या स्वाधीन ? मग कशाला मी तुझ्या अंगाला हात लावतों आहे ? "

" तूं मला ठार कर, नाही तर आणखी हव तें कर. तुला या

पुतळयाना मी मुळीच हात लावूं देणार नाहीं. मग त्यापायीं माझा जीव गेला तरी बेहेत्तर!"

तिच्या स्वरोच्चारात निश्चयाचा स्पष्ट ध्वनि उमटला होता.

भागीच्या या स्पष्ट नकाराने भिकूचा राग पुन्हा चेतविला गेला.

"थांब राडे, फार माजलीस तूं. तुला ठारच करतो एकदम." असें काहीसें तोंडानें म्हणत तो एकदम तिच्या अंगावर धावून गेला. भागीहि काही बेसावध नव्हती. असले प्रसंग अलीकडे तिच्या परिचयाचे झाले होते.

लग्नानंतर काहीं वर्षे भिकू तसा चागला होता. तेव्हा त्या दोघा नवराबायकोचा चिमुकला संसार सुखासमाधानाचा होता. पण अलीकडे काही वर्षे भिकूला त्याच्या कामावरील सोबत्याच्या संगतीनें दारूचें व्यसन लागलें होतें. तेव्हापासूनच त्याच्या संसाराचे असे धिडवडे सुरू झाले होते. भिकूचें हें व्यसन सुटावे म्हणून भागीनें पुष्कळ खटपट करून पाहिली. भिकू शुद्धीत असला म्हणजे तिच्या प्रयत्नाला थोडेसें यश येई, नाही असें नाही. पण मित्राच्या मेळयात गेल्यावर भागीला दिलेल्या आणाशपथाची त्याला बिलकूल आठवण रहात नसे. त्यामुळें भागीचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरून भिकू अधिकाधिक व्यसनाधीन होत गेला. दारूच्या निशेंत भागीबरोबर भाडणाचे प्रसग वरचेवर येऊ लागले व होता होतां भागीवर हात टाकण्यापर्यंतहि त्याची मजल पोचली.

भिकूच्या या वाढत्या 'वीरश्री'मुळें भागीच्या मनात त्याजविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन तो वाढीस लागला. पति म्हणून भिकूबद्दल तिला पूर्वी वाटत असलेला आदर नाहीसा झाला. आघातास प्रत्याघात या न्यायानें त्याच्या अपशब्दाना तीहि त्याच

वर्गांतील शब्दांनी उत्तरें देऊं लागली. आणि असे प्रसंग प्रत्यही घडत गेल्यामुळें ते आतां तिच्या इतके अंगवळणीं पडून गेले होते, कीं आपण करतों यांत कांहीं चूक घडत आहे असा विचार चुकूनहि तिला शिवत नसे. उलट अशा प्रत्येक प्रसंगामुळें भिकूबद्दलचा तिचा तिरस्कार इतका वाढला, कीं ती त्याच्या तोंडावर त्याचा मृत्यु इच्छिण्यासहि कमी करीत नसे !

आजचा प्रसंगहि त्यापैकीच एक होता. त्यातून पुतळयाची माळ तोडल्याबद्दल भिकूला काय करूं न् काय नको असें भागीला झालें होतें. त्यामुळें भिकू अंगावर धावून येताच एखाद्या चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें तिने त्याच्यावर हल्ला केला. शेणाच्या बाहुलीच्या अंगी लत्ताप्रहार सहन करण्याची शक्ति कोठून असणार ? निशेच्या तारेंत असलेल्या भिकूच्या अंगीहि भागीचा तो त्वेषाचा हल्ला परतविण्याचें सामर्थ्य नव्हतें. भागीचा तो रुद्रावतार पाहताच भिकूनें एकेक पाय मागें घेण्यास सुरुवात केली. भागीहि त्याच्या रोखाने पुढें येत असलेली पाहून 'यःपलायति स जीवितम्' असा दूरदर्शी विचार मनाशी करून भिकोबानी खोपटाच्या दाराकडे मोर्चा वळविला.

भिकू त्या खोपटाचें दार उघडून बाहेर पळून जाण्याच्या विचारात होता. इतक्यात बाहेरून कोणी तरी लाथ मारल्यामुळे दार आपोआप उघडलें गेलें. भिकूचे व भागीचेहि चार डोळे दाराकडे वळले. तीं दोघें जागच्या जागीच थबकलीं. त्यांचे डोळे विस्मयातिरेकाने विस्तारले जाऊन ते दारातील देखाव्यावर खिळून राहिले.

पलीकडच्या कोपऱ्यावर असलेल्या गुत्त्याचा मालक दोन पोलिसा-

समवेत दारात उभा असल्याचें दोघाच्याहि दृष्टीस पडलें. आपल्या तावडीत सापडलेल्या मृत हरणाकडे कोल्हा ज्या लोभी क्रूरपणानें पाहतो तसा तो गुत्तेवाला भिकूकडे पाहत होता.

" पकडा या पाजी चोराला ! "

गुत्तेवाल्यानें आपल्याबरोबर आणलेल्या पोलिसाना 'हुकूम' केला. छू: म्हणताच हल्या त्या माणसाच्या अंगावर धावणाऱ्या कुत्र्याच्या आज्ञाधारकपणानें त्या पोलिसानी भिकूचे दोन्ही दंड पकडून त्याला काढण्या आवळण्यास सुरुवात केली. भुलभुलैयामध्यें सापडलेल्या खेडवळाप्रमाणे भिकू 'आ' वासून उभा राहिला. काय करावें किंवा काय बोलावें हें त्याला काहींच सुचेना.

भागीचीहि काही क्षण तीच अवस्था झाली. पण भिकूला पोलिस पकडून नेणार हें ध्यानात येताच तिने एकदम भिकूच्या गळयाला घट्ट मिठी मारली व रडत रडत गुत्तेवाल्याला विचारलें—

" का हो माझ्या घरधन्याना पोलिसात गुदरता? त्यांनीं तुमचं काय केल ? "

" काय केल ? " माजराप्रमाणें ठिस्फिस् करीत गुत्तेवाला ओरडला, " करूनसवरून वर शहाजोगपणा मिरवायला हवा? वा ग टवळे ! ( पोलिसाना उद्देशून ) चला त्या चोराला घेऊन चावडीवर. फौजदारसाहेब त्याचा इन्साफ करतील. चला. "

गुत्तेवाल्यानें 'हुकूम' केला. पोलिसानीहि त्याची अंमलबजावणी करण्यासाठी भिकूस दोन धक्के देऊन पुढे ढकलण्याचा प्रयत्न केला; पण भागीनें भिकूला मिठी मारल्यामुळें ती सोडविल्याखेरीज भिकूला पुढें नेणें शक्य नव्हतें. आलेल्या या अकल्पित संकटानें भिकूची मति तर गुंग होऊन गेली होती. पोलिसाच्या एकदोन धक्क्यानीच त्याची

दारूची धुंदी नाहीशी झाली होती. मर्दासारखा मर्द असूनहि या प्रसंगी काय करावें—बोलावें हें त्यास सुचेनासें झालें. भिकूवर आलेल्या या संकटानें भागीला आलेला त्याचा राग मात्र वाऱ्याच्या झोतानें भुसकट उडून जावें तसा उडून गेला व तिच्या हृदयांतील पतिप्रेम जागृत झालें. तिनें भिकूच्या गळयाला आवेगानें घट्ट मिठी मारली व मोठ्यानें रडण्यास आरंभ केला. त्या दंगलीमुळे शेजारपाजारचे काही लोक काय भानगड आहे तें पाहण्यासाठीं तेथें जमा झाले.

हा प्रकार पाहून गुत्तेवाला खूप गरम झाला. तो पोलिसांवर खेकसून ओरडला--

"अरे साल्यानों, बघत काय राहिलां ? करा त्या टवळीला दूर आणि ओढा त्या चोराला बाहेर ! दारू प्यायची ती प्यायची आणि वर आमच्या दुकानात चोऱ्या करतो बदमाष. जेवल्या ताटात......"

पण गुत्तेवाल्याचें तें वाक्य पुरें होऊं शकलें नाही. मध्येंच भागीनें भिकूची मिठी सोडून गुत्तेवाल्याचे पाय धरले व रडत रडत ती म्हणाली—

"नका हो नका, त्यांना चावडींत नेऊं नका. त्यानी तुमचं काय केलं आहे ?"

"काय केल? चोरी केली ! चोरी. चागले दहा रुपये उपटलेन् साल्यानं माझ्या गुत्त्यातून."

"कोणी मी ?"

भिकूनें काहीं तरी बोलण्याचा प्रयत्न केला. पण पोलिसांनी त्याला तेथल्या तेथेंच मोडून काढला. 'आरोपी' इसमाच्या तोंडून गुन्ह्याच्या कबुलीखेरीज दुसरें काहीं ऐकण्याची पोलीस खात्याला संवय नसते !

" नाही हो ! " भागी कळवळून म्हणाली. " ते दारू पितात तरी चोरीसारखं वंगाळ काम ते करणार नाहीत."

" मग कोणी तुझ्या बापानं माझे रुपये चोरले काय? थाब, आता या साल्याला चावडींत गुदरतों आणि मग बघतों कसा कबूल होत नाही तो. फौजदारसाहेबाकडून चांगला इंगा फिरला म्हणजे कळेल."

फौजदारसाहेबाचा इंगा कसा असतो याच्या अनेक ऐकीव गोष्टी भागीला माहीत होत्या. त्या सर्वांची एक मालिकाच क्षणार्धात तिच्या मनश्चक्षूपुढून घोडदौडीनें निघून गेली. अवघ्या दहा रुपया-साठीं या फौजदारी इंग्याचा प्रसाद भिकूला अनुभवावा लागणार, ही कल्पना तिच्या मनात येताच तिचें अंग शहारलें. ती अधिकच विनवणीच्या स्वरानें म्हणाली—

" नका हो नका, असे कठोर होऊं नका. माझ्यावर दया करा अन् त्याना सोडा."

पण फुलाच्या भारानें कधीं फत्तर फुटला आहे काय? भागीच्या करुण विलापसरितेच्या आघातानेंहि त्या गुत्तेवाल्याच्या हृदयाचा तट दुभंगला नाहीं. तो आपलीं पिंगट बुबुळें फिरवीत व नाक फेंदारीत कर्कश आवाजात म्हणाला—

" तुझ्या या चोरट्या नवऱ्याला सोडूं काय? वाः! खाशी! आणि माझे रुपये कोण देणार? तूं, का तुझा बाप! ए पोलिसांनो, चला रे एकदम चावडीकडे."

पोलिसानीं एक पाऊल पुढें टाकलें. गुत्तेवालाहि दाराकडे वळण्या-साठीं पाय उचलण्याच्या तयारीत होता. पण त्याच्या पायाची मिठी अधिकच घट्ट करीत भागी म्हणाली—

"मायबाप, असे कठोर होऊं नका. मी तुमचे पैसे देईन पण त्यांना सोडा."

गुत्तेवाल्यानें विचार केला की, या बयेची ब्याद टाळण्यास ही युक्ति बरी आहे. तिच्याजवळ काही दहा रुपये रोख असणें शक्य नाही. तेव्हा रोख पैसे देत असशील तर भिकूला सोडतो असें सागितल्यास या बाईची म्गराभेठी तरी सुटेल, या विचारानें तो म्हणाला—

"बरं तर; तूं जर मला आत्ताच्या आत्ता रोख बारा रुपये देत असशील, तर मी तुझ्या नवऱ्याला एक वेळ माफी करतों. पण पुन्हा मात्र त्यानं अशी चोरी करता कामा नये."

"नाही हो, पुन्हा ते मुळीच असलं काही करणार नाहीत. द्या त्याना आज सोडून. मी तुमचे पैसे काहीहि करून फेडीन बघा. माझ्या-वर विश्वास ठेवून त्याना तुम्ही सोडा. मी तुमच्या पाया पडते."

"अहं! तसला हवालाबिवाला नाही चालणार. रोख रुपये मोजशील तर सोडतों. नाही तर जाईल साला खडी फोडायला तुरुंगात."

"पण इतके रुपये मी आज एकदम कुठले आणू?"

"तें मी काय सागू? नवरा सुटावा असं तुला वाटत असलं तर आण हवे तिथून. नाही तर हे आम्ही चाललों चावडीवर त्याला घेऊन. चल रे."

असें म्हणून गुत्तेवाला दाराच्या रोखानें वळला सुद्धा. भागीनें क्षण-मात्र काहीं विचार केला व मघाच्या झटापटीत तुटून पडलेली

पुतळ्याची माळ लुगड्याच्या ओच्यातून काढून तिनें ती त्या गुत्ते-वाल्यापुढें करीत म्हटलें--

"ही माळ मी तुम्हाला देतें. ही विका व तुमचे पैसे घ्या. माझ्या-वर दया करा. त्याना सोडा हो."

पुतळ्याच्या माळेची किंमत खात्रीनें पंधरा रुपयापेक्षा तरी अधिक येईल हें गुत्तेवाल्याला कळून आलें. हें चालून आलेलें घबाड हातचें दवडण्याइतका तो खुळा नव्हता. त्यानें पोलिसाना काही खूण केली. ज्या गावच्या चोरी त्याच गावच्या चाभळी! त्यानाहि ती खूण समजली. भिकूच्या दंडाचे दोरखंड सोडून ते गुत्तेवाल्याबरोबर झोंपडीच्या बाहेर पडले.

बाहेर जोराचा पाऊस पडत होता. आकाशात वीज कडकडून ती जवळच कोठें तरी पडल्यासारखा आवाज ऐकूं आला. जोराचें गडगडणें सुरू होतें !

# मवाली नशा !

कांही कांही वेळाच माणसाच्या आयुष्यात अशा अशुभ येतात, कीं त्याच्या ध्यानी मनीं स्वप्नींहि कधीं येणार नाही अशी एखादी गोष्ट तेव्हा त्याच्या हातून होऊन जाते. एखाद्या झिंगलेल्या दारुबाजा-प्रमाणें त्याच्या मनावर तेव्हा त्या वेळेची नशा इतकी चढते, की आपल्या हातून काय घडत आहे, तें बरें आहे कीं वाईट आहे, याची शुद्धिहि त्याला राहत नाही. विद्युत्शक्तीच्या पट्ट्यात सापडलेल्या वस्तूसारखीच माणसाचीहि स्थिति अशा वेळी अगदीं अगतिक होऊन जाते.

निदान माझें तरी त्या दिवशीं अगदी असेंच झालें. मी काय करीत आहे, आणि त्याचा परिणाम काय होईल याची माझ्या मनाला पुरी जाणीव होण्यापूर्वीच माझ्या हातून तें कृत्य होऊनहि गेलें होते. लक्ष्य ठरण्यापूर्वीच न कळत शिकाऱ्याच्या बंदुकीचा घोडा दाबला जाऊन बार उडावा तसाच कांहींसा माझाहि प्रकार झाला.

माझ्यांतील खल पुरुष तेव्हा प्रबल व प्रभावी ठरला. आणि कौरवां-च्या चक्रव्यूहात चिमकुल्या अभिमन्यूची जी अवस्था झाली तशीच दबकत दबकत अंतःसूचना देणाऱ्या माझ्या क्षीणशक्ति सद्विचाराची स्थिति झाली. एरव्ही मी ताराबाईंना त्या दिवशी प्रथमच पाहिलें होतें असें नाहीं, किंवा त्यांच्याशी एकांतात बराच वेळ गप्पा मारीत बसण्याचा तो माझा पहिलाच प्रसंग होता असेंहि नाहीं. त्यांची माझी ओळख होऊन चांगली चार-पांच वर्षे झाली होती. मी कॉलेजच्या शिक्षणासाठी पुण्याला पहिल्याने आलो तेव्हापासून डॉक्टर खानसामे यांच्या घरातील तिसऱ्या मजल्यावरची एकुलती एक खोली भाड्यानें घेऊन मी तेथें जवळ जवळ कायमचेंच बिऱ्हाड केल्यासारखें केलें होतें. कॉलेजला सुटी होई तेव्हा मी गावी जाई खरा, पण खोलीवर हक्क ठेवूनच जाई. कारण पुण्याला चांगल्या, सोइस्कर, कमी भाड्याच्या खोल्या विद्यार्थ्यांना फार विरळा मिळतात !

डॉक्टर खानसामेहि पण मला चांगले घरवाले भेटले. माझ्याशिवाय दुसऱ्या कोणासहि ते ती खोली भाड्यानें देत नसत. डॉक्टरसाहेबांचें हे प्रेम मी अर्थात्च स्वपराक्रमानें संपादन केलें होतें. त्यांच्या घरी राहावयास गेल्यावर व्यसनसमानतेमुळें लौकरच त्यांची माझी गट्टी जमली. सारख्या पंखांची पाखरें एकत्र यायचींच ! त्याप्रमाणें रोज रात्री तास अर्धा तास बुद्धिबळें खेळण्याच्या डॉक्टरांच्या हौसेला मी आपखुषीनें पाठिंबा देताच त्यांच्या व माझ्यामध्ये स्नेहभाव निर्माण झाला.

मी तरुणबांड अठरा उमरीचा होतो आणि डॉक्टर निदान माझ्या दुपटीनें तरी पावसाळे पाहिलेले होते. त्यामुळें आमच्यामध्यें जो आपलेपणा उत्पन्न झाला तो मित्रामित्रामधील समानभावनेऐवजीं

पितापुत्रामधील वात्सल्यादरभावाचाच अधिक होता. डॉक्टर स्वभावतः-च प्रेमळ मनाचे होते हे तर झालेंच, पण घरच्या गरीबीमुळें शिक्षण-क्रम पुरा करून स्वतःच्या पायावर उभे राहून संसार करण्याची ऐपत येईपर्यंत त्यांचे लग्न लांबणीवर पडलें होतें. त्यामुळें अपत्य-स्नेहाचा अनुभव डॉक्टरांना अलीकडेच येऊं लागला होता हे दुसरें; या दोन कारणांमुळें डॉक्टर माझ्याकडेहि पहिल्यापासून वात्सल्याच्या नजरेनेच पाहत असत.

डॉक्टरांच्या पत्नी ताराबाई यांचें रूप चांगलें होतें, की स्वभाव सरस होता हें अनेक दिवसांच्या सहवासानेंहि मला नक्की सांगणें कठीण होई. ऐन तारुण्यामुळें यौवन कसें त्यांच्या अंगप्रत्यंगांमधून निथळत आहे असा पाहणारास भास होई. त्यांच्या बारीक घाऱ्या डोळ्यांतील पाणी कांहीं निराळेंच वाटे. रुंद जिवणीच्या त्यांच्या ताम्बूस मुखकमलावर पावित्र्याचें पाणी खेळत असे. आणि त्यांच्या या सौंदर्यसरोवरांत गालावरील लहानशा नाजूक खळींत उठणाऱ्या हास्य-वीची तर इतक्या मोहक असत, की पाहणाऱ्यास त्यांचा मोह कधींच आवरूं नये.

ताराबाईंच्या या सौंदर्यापेक्षाहि मला त्यांच्या प्रेमळ स्वभावाचें आकर्षण अधिक वाटे. मी प्रथमच डॉक्टरांच्या घरीं खोली घेऊन राहावयास गेल्यावर श्रावण महिन्यांतील सणावाराच्या निमित्तानें डॉक्टरांनीं मला घरीं 'ब्राह्मण' म्हणून जेवावयास बोलाविलें, तेव्हां पहिल्याच परिचयांत मला ताराबाईंच्या स्वभावांतील जो गोडवा दिसून आला तो परिचयानें इतका वाढला, कीं न कळतच माझें मन त्यांच्याकडे ओढ घेई. आणि त्यांची लाडिक आवाज काढून आणि गाल किंचित् फुगवून बोलण्याची लकब तर मला इतकी आवडे, की

त्या लोभानें मी ताराबाईशी बोलण्याचे प्रसग मुद्दाम साधीत असे, असें म्हटल्यास फारसें खोटें ठरणार नाही.

डॉक्टराच्याप्रमाणेंच ताराबाईहि माझ्याशी मोकळ्या मनानें व आपलेपणानें वागत असत. वयाची साधारण बरोबरी, त्यामुळें आमच्यात जो आपलेपणाचा भाव होता तो बधु-भगिनी स्वरूपाचा होता हें मी प्रतिज्ञेनें सागावयास तयार आहे. मग तुम्ही तें खरें माना किंवा नका मानूं. पण माझें अन्तःकरण साक्ष आहे, कीं त्या एका दुष्ट-काळरात्रीपूर्वीपर्यंत ताराबाईशी मी धाकट्या भावाप्रमाणेंच वर्तन ठेवलें होतें. आणि ताराबाईनी तर वडील बहिणीला शोभेल अशा किंचित् वात्सल्ययुक्त प्रेमानें मला वागविलें होतें.

झालें काय, कीं त्या रात्री मी आणि ताराबाई रोजच्यासारख्या गप्पा मारीत बसलो होतों. डॉक्टर धद्याच्या निमित्तानें माळव्या-कडे दौऱ्यावर गेले होते. डॉक्टराना बाहेरगावीं जाण्याचे प्रसंग बरेच येत असत. तेव्हा परिचयानें आपलेपणा वाढल्यावर डॉक्टर बाहेरगावीं गेले, की घरीं मी सोबत करीत असे. हा गेल्या चार-पाच वर्षांपासूनचा शिरस्ताच पडला होता म्हणा ना! त्याप्रमाणें आजहि खानावळीतून जेवणखाण आटपून मी रात्रीं साडेआठच्या सुमारास घरीं परत आलों.

कपडे वगैरे काढून ठेवून मी स्वयंपाकगृहात सरळ गेलों, तेव्हा ताराबाई नुकत्याच जेवावयास बसल्या होत्या.

मी विचारलें—

"का, आज जेवायला उशीरसा केलात इतका?"

डोळयातील घारी बुबुळे माझ्या सर्वांगावरून एकदोनदा फिरवून व गाल किंचित् फुगवून लाडिक आवाजात ताराबाईनी उत्तर केलें—

" आज संध्याकाळीं गेलें होतें अक्काच्या घरीं. माझी मुबईची बहीण आल्याचं कळल, तेव्हा म्हटल यावं तिला भेटून. तिथं सध्याकाळ केव्हा होऊन गेली कळलंच नाही बोलण्याच्या नादांत, त्यामुळं मग घरच्या सगळयाच कामाना झाला उशीर थोडा थोडा!"

असें म्हणून ताराबाई गालाला खळी पाडून किंचित् हसल्या.

त्यांच्या हसऱ्या चेहऱ्यावर दृष्टि रोखून मीहि हसत हसत विचारलें—

" एकूण तुमच्या मुबईच्या ताईसाहेब जबर गोष्टीवेल्हाळ दिसतात! बाकी तुमचीच बहीण, तेव्हा काही तरी समान गुण असणारच!"

आपले घारे डोळे एवढाले करून माझ्याकडे कृत्रिम रागानें पाहत ताराबाई म्हणाल्या—

" म्हणजे! मी फार बडबडी आहे वाटतं? अहो, मला तुम्ही बडबडी म्हणता मग आमच्या ताईला काय नाव ठेवाल?"

" पण इतकं बोलतात तरी काय तुमच्या ताई?"

" अहो, एक ना दोन. हजार गोष्टी सागते ताई एका बैठकीला. आज तर तिनं मुंबईच्या इतक्या गमतीन् गोष्टी सागितल्यान्, की त्या ऐकून माझी मति अगदी गुंग होऊन गेली बघा!"

" वा, मग एकूण तुम्हाला आज घरबसल्या मुंबई पाहण्याचं श्रेय मिळालं म्हणायचं." मी किंचित् हसत हसत म्हटले, " आम्हाला सांगा ना मुंबईच्या काही जमती तुमच्या ताईनी तुम्हाला सागितलेल्यापैकी. मुंबई गाव मला फार आवडतं बघा. मुंबईत काही दिवस

तरी राहायला मिळावं अशी माझी खूप इच्छा आहे. त्यामुळं मुंबईबद्दल कोणी कांही सागूं लागालं, कीं मी तें लक्षपूर्वक ऐकतों."

"इश्श ! इतक ते काय आहे त्या मुंबईत ?" कपाळाला दोन बारीक आठ्या घालून आपले घारे डोळे किंचित् विस्फारून ताराबाईनीं विचारले, "मला तर मुंबई म्हणजे शुद्ध मरणपुरी वाटते !"

"तुम्ही कधी मुंबईला राहिलाच नाही वाटतं ?"

"मी कशाला तिथं राहतें आहे ? कधी मधीं गेलें तरी दोनचार दिवसापेक्षा काही अधिक नाही राहिले कधी."

"म्हणूनच मुंबईतील खरी गम्मत तुम्हाला नाही ठाऊक. चार-दोन दिवस राहून मुंबईची खरी कल्पना कशी येणार ?"

"इश्श ! कसली खरी कल्पनान् काय ? आमची ताई तर आता आठ वर्षे आहे मुंबईला. ती तर म्हणते मुंबईपेक्षा मसणपुरी सुद्धा चागली."

"का, ताईसाहेबाचा बिचाऱ्या मुबईवर एवढा राग कां ? कळूं दे तरी मला."

"ती सांगत होती, की आमच्यासारख्या बायकाना मुंबईत-पुण्या-प्रमाण काही सुख वाटत नाही. एकटं-दुकटं कुठ जायची सोय नाही. रस्त्यात म्हणे मवाली की फिवाली कोण ते मेले भारीच पाचकळपणा करतात. चांगल्या बायकाना तर त्याच्यापासून फार त्रास पोंचतों म्हणें. ताई तर सागत होती, की कांहीं कांही धटिंगण तर इतके हलकट असतात म्हणे, की ते ट्रॅममध्यें बायकाशी वाईट वर्तन करतात...... !"

"अहो, त्या बायकाहि तसल्याच असतात." मी ताराबाईना मध्येच अडवून म्हटलें.

"तुमचं आपलं काही तरीच." गाल फुगवून ताराबाई उद्गारल्या,

" ते मवाली दाडगे घरंदाज बायकावर सुद्धा प्रसंग आणायला कमी नाहीत करीन."

ताराबाईच्या फुगीर गालावर किंचित् रागाची व किंचित् तिरस्काराची उमटलेली छटा त्यांच्या मूळच्या सौंदर्यांत भर टाकीत होती. जेवण आटपून नुकत्याच त्या उठल्या होत्या. कपाटातील कुटलेली सुपारी थोडीशी तोंडात टाकून नेहमीप्रमाणें त्यानी माझ्याहि हातावर थोडी सुपारी ठेविली. मी खाली पाटावर बसलेला असल्यामुळें किंचित् वाकून, ओणव्यानें माझ्या हातावर सुपारी ठेवताना त्यांच्या चेहऱ्यावर पडलेल्या विद्युद्दीपाच्या छायाप्रकाशामुळें ताराबाईचें मी रोज पाहिलेलें सौंदर्य मला त्या क्षणीं अगदी वेगळें वाटलें. त्या सौंदर्यातील उत्तेजक मादकपणाचा अनुभव मला त्या वेळेला प्रथमच आला. तशात सुपारी देताना झालेल्या त्यांच्या नाजुक हस्तस्पर्शानें तर माझी मति क्षणभर बधिर झाली. मानेवर बसलेल्या लाठीच्या जोरदार तडाख्यानें बुद्धि कांहीं क्षण सुन्न होऊन जावी, तसेंच माझें झालें.

मुंबईच्या एखाद्या मवाल्यानें माझ्या शरीरात प्रवेश केला असेल याची थोडी देखील कल्पना नसलेली बिचारी ताराबाई पुढें सांगू लागली—

" अहो, रस्त्यावरचंसं काय, पण चांगल राहत्या घरीं सुद्धा, चांगल्या बायकावर मुंबईला फार घाणेरडे प्रसंग येतात म्हणून म्हणत होती ताई. नोकरीसाठी सारीं पुरुषमाणसं दुपारी ऑफिसला गेली, कीं मागं चाळीत साऱ्या बायकाच उरतात. अशा वेळी मुसलमान फेरीवाल्याची गिधाडं चाळींत जिन्नसपान्नस विकण्याच्या निमित्तानं शिरतात आणि

बायकांच्यावर भलते सलते प्रसंग आणतात म्हणे. छे! नको ग बाई ती मुंबई!"

शेवटचें वाक्य म्हणताना भीतीनें ताराबाईंनीं अंग थरारल्यासारखें केलें. माझें आता त्यांच्या बोलण्याकडे फारसे लक्ष नव्हतें. त्यांच्या आरक्त फुगीर गालावर व उघड्या बाह्यांच्या ब्लाऊजमधून दिसणाऱ्या त्यांच्या गौरवर्ण हातावर माझी नजर या वेळी खिळून राहिली होती. एकीकडे माझ्याशी बोलत असतांच दुसरीकडे ताराबाई घर-खरकटी आवरण्याचेंहि काम करीत होत्या. त्यामुळें त्यांना वारंवार तेवढ्यातल्या तेवढ्यांत इकडे तिकडे पळावें लागत होते. त्यामुळें विद्युत्प्रकाश निरनिराळ्या कोनांनी त्यांच्या बांधेसूत शरीरावर पडून त्यांच्या सौंदर्याच्या वेगवेगळ्या छटा माझ्या दृष्टीस उन्माद चढवीत होत्या. एखाद्या पर्वताच्या सपाटीवर उभें राहून, त्या पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून नागमोडी वळणें घेत घेत वाहत जाणाऱ्या सरितेप्रमाणें त्या वेळीं होणाऱ्या ताराबाईंच्या शरीराच्या भिन्न भिन्न हालचाली मी बसल्या बसल्या पाहत होतों.

"मुंबईच्या आसपासच्या गांवातून राहाणाऱ्या बायकांची तर विचारूंच नका अवस्था. सकाळीं नऊ-साडेनऊला एकदा का घरची पुरुष मंडळी कामाला मुंबईला गेली, की रात्रीपर्यंत घरी मेलं एकट्या बायकांनी राहायचं. मोठमोठ्या श्रीमंतांच्या बायकांच्या घरी गडी-माणूस तरी असतं एखाद, पण आमच्यासारख्या गरिबाच्या घरीं कोण असणार? अशा स्थितीत बायकांचा जीव आणि अब्रू एक-सारखी धोक्यांत असायची. रात्र पडून पुरुषमंडळी घरी आली म्हणजे तो दिवस मिळविला म्हणायचा, अशी आहे तुमची मुंबई! समजलं का?"

शेवटचा प्रश्न विचारतांना ताराबाई घारे डोळे विस्फारून व गाल किंचित् फुगवून काहीशा मिस्कीलपणानें हसून माझ्याकडे पाहत होत्या. त्यांच्या त्या दृष्टीनें माझ्या हृदयात जें कांहीं झालें आहे तें वर्णन करणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे. वाटलें एकदम उठावें, नि ते हसरे गाल...

अंगावर चालून येऊं पाहणारी समुद्राची प्रचंड लाट मोठ्या शिकस्तीनें चुकवावी, तद्वत् मनातील प्रबल विकाराचा तो जबर तडाखा मी कसाबसा चुकवला. तेथून एकदम उठून जावें असें मला वाटलें. पण ताराबाईच्या सौंदर्यपानाचा मोहहि मला आवरता येईना.

" का, बोलत का नाहीं ? मुंबई फार चांगली ना ? पुरुषाना असेल मुंबई चागली, पण आम्हा बायकाना तर ती फार वाईट. अगदी चागल्या श्रीमंत बायकाच्या अब्रूचे सुद्धा मुंबईत धिंडवडे होतात. ताई सागत होती, एका श्रीमत भाटयाच्या बायकोची गोष्ट. हा व्यापारासाठी दिवसभर मुबईला जाई; अन् मागं घरी त्याची तरुण, सुंदर बायको न् एक कोंकणी बालू गडी !— एके दिवशी त्या गड्यानं... बिचारी बाई ! काय करावं तिला समजेना. नवऱ्याला सागायचीहि चोरी ! छेः बाई, भारीच किळसवाणी तुमची मुबई ! ...... "

असें म्हणून माझ्या शेजारचा ताब्या उचलण्यासाठी वाकून ताराबाईनीं पुढें केलेला हात मी एकदम घट्ट पकडला; आणि आवेगाने त्या गोंडस लुसलुशीत हाताचें एकवार जोरानें चुंबन घेतलें. त्या सुंदर हातावर चुंबनाचा अभिषेक करण्याचा माझा विचार होता. पण ताराबाईनीं एकदम तो हात इतक्या जोरानें ओढून घेतला, की मी मागें कलंडल्यासारखा झालों. केळासारख्या लुसलुशीत हाताचें एकदम लोखंडाच्या कांबींत रूपातर झालें !

ताराबाईच्या डोळयातून रागाचा वर्षाव होत होता. सारा चेहरा लाल झाला होता. सुदर हरिणीची क्रूर वाघीण बनली होती! ताराबाईच्या चेहऱ्यावर सौंदर्याऐवजी भेसूरपणा दिसत होता!

माझ्या डोळयांवर चढलेली सौंदर्याची मादक नशा एकदम साफ उतरली. मघाशीं ताराबाईच्या सौंदर्याचें अतृप्त लोचनांनी आकंठ पान करणाऱ्या माझ्या दृष्टीला आता त्याच्या डोळयाला डोळा देण्याचेंहि धैर्य झाले नाही. माझे काळवंडलेलें अधोवदन वर उचलण्याचें त्राण माझ्यात मुळीच उरले नव्हतें!

ताराबाई इतक्या संतापल्या होत्या, की त्याच्या तोंडून शब्दहि बाहेर पडेना. अंगांतील सारी शक्ति एकवटून त्या कशाबशा उद्गारल्या—

"मवाली...मुंबइचा मवाली भेला! ..."

प्रयत्न करूनहि ताराबाईच्या तोंडून अधिक एक अक्षरहि उमटेना.

आणि आतां त्याची जरूरहि नव्हती. त्या चार शब्दांनींच मी पूर्ण शुद्धीवर आलों होतों!

घडून आलेल्या साऱ्या विपरीत घटनेचा अर्थ आतां माझ्या पूर्ण ध्यानीं येऊन चुकला. पण बैल गेल्यावर झोपा करून काय उपयोग? माझ्यावर चढलेल्या मवाली नशेनें मला एका क्षणांत पशु करून टाकलें होतें!

आतां एक क्षणभरहि ताराबाईच्या समोर मला बसवेना. झाल्या प्रकाराचा खुलासा करण्याची ती वेळ नव्हती, आणि मला तोंड तरी कुठें होतें तसें करायला.

तें काळेंतोंड घेऊन मी ताडकन् उठलों, आणि घराबाहेर पडलो. घरापासून जितक्या दूर जाता येईल तितक्या दूर शक्य तितक्या जलदीनें मी जात होतों.

दाही दिशातून ताराबाईच्या कठोर शब्दाचे तीव्र आघात माझ्या कानांवर होत होते—

" मवाली... मुंबईचा मवाली मेला ! ... "

# स्त्री आणि पुरुष

दुपारचे दोन वाजावयाची वेळ होती. उन्हाच्या तीव्र तापानें सारी सृष्टि कशी तापानें वाळलेल्या आजारी माणसासारखी म्लान व तेजोहीन दिसत होती. माणसानी घराचा आश्रय घेतला होता, तद्वत् झाडाच्या पानांनी देखील उन्हापासून स्वसंरक्षण करण्यासाठीं वृक्षशाखाना चिकटून राहण्याचेंच ठरविल्यामुळें वाऱ्याची झुळूकहि येत नव्हती. सारी सृष्टि कशी चैतन्यहीन दिसत होती.

अशा ऐन उन्हाच्या वेळीं घराचा शीतल आश्रय सोडून बाहेर पडण्याचें कोण मनात आणील?

मलाहि वाटत होतें, कीं आमच्या घराचे मालक श्रीयुत राजमान्य राजश्री बन्याबापू दंडके याच्याप्रमाणें आपल्या खोलीसभोंवार वाळ्या-च्या पडद्याचा पहारा ठेवून उन्हाच्या तापास आंत येण्यास सक्त

मनाई करून, प्रशस्त पलंगावर विजेच्या पंख्यानें वारा घेत नुसतें आरामात पडून राहावें.

पण श्रीयुत दंडके याच्या बंगल्यातील 'आउटहाउस'पैकी एक खोली भाड्यानें घेऊन राहणारा मी एक साधा रोजगारी कामगार होतों, आणि दडके हे एक प्रख्यात सावकार होते, एवढाच काय तो फरक !

त्याच्याप्रमाणें सबंध दिवसभर पलंगावर पडून राहण्याची कितीहि तीव्र इच्छा झाली, तरी दीडचा ठोका घड्याळात पडला, की त्या मोहक कल्पनेची नाजुक काचपात्रें त्या ठोक्यानें तत्काळ भगून जात आणि कठोर वस्तुस्थितीच्या काचा मात्र पायात बोचूं लागत !

त्या तशा तळपत्या उन्हात मी अंगात कपडे चढवून कामावर जाण्यासाठी निघालों होतों. दंडक्याच्या भाग्याचे व आपल्या दैव-हीनतेचे विचार मनाला आंतून चटके देत होते, आणि तापल्या सूर्य-किरणाच्या पोळत्या झळा शरीराला बाहेरून भाजून काढीत होत्या.

हा दुहेरी ताप शक्य तितका कमी करण्यासाठी म्हणून मी आपला नेहमींचा राजमार्ग सोडून बाजूच्या जवळच्या रस्त्यानें जावें म्हणून पोलीस-ठाण्याचा रस्ता पकडला. या ठाण्यावरून माझें रोजगाराचें ठिकाण थोडें जवळ पडे, इतकेंच.

झपझप पावले टाकून मीं पोलीस-ठाणें तर गाठलेंच; पण तेथें आज मला जो 'चमत्कार' दिसला त्याचें मला नवल वाटलें.

आपल्या पल्लेदार दाढीच्या केसाशी डाव्या हातानें खेळत उजव्या हातांत धरलेलें मुंबईच्या 'पाठक आणि मंडळी'चें कोणतें तरी पुस्तक वाचीत चौकीच्या चौथऱ्यावर बसून राहणाऱ्या त्या एका मुसलमान पोलिसाशिवाय ज्या चौकीवर कधी कोणी चिटपांखरूंहि दिसावयाचें

प्रश्नाना विभावतीनें दिलेल्या उत्तराची बेरीज करून मिळालेली हकीकत अशी--

विभावतीच्या मावशीनें आज तिला जेवायला बोलाविले होते. मावशीचें घर सुमारे फर्लांगाच्या अंतरावर असेल. विभावती नेहमींच एकटी मावशीच्या घरी जात असे, हे मला माहीत होतें. त्याप्रमाणें ती आज जेवाजयासाठी दुपारी अकरा वाजण्याच्या सुमारास घरातून बाहेर पडली होती, हेंहि मला दुपारी तिच्या आईनें सागितलें होतें. मावशीकडे जेवण वगैरे करून घरी येत असता वाटेंत विभावतीस एका अनोळखी माणसाने थाबवून विचारले—

" बाळ, तुझं नांव काय ? "

विभावतीनें धीटपणें उत्तर दिलें—

" विभावती. "

" वा, तूं बरीच हुशार मुलगी दिसतेस ! " तो गृहस्थ तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाला, " बाळ, तुला जाभळं हवीत का खायला ? "

जाभळाचे नाव काढताच विभावतीचा चेहरा खुलला. ती उत्तेजित स्वरानें म्हणाली—

" हो, द्या पाहूं. "

" चल, आपण त्या पलीकडच्या बागेंत जाऊं. तिथं मी तुला हवी तितकीं जाभळं काढून देतो झाडावरची हं ! "

त्या गृहस्थाच्या गोड गोड भाषणाला भोळी बिचारी पोर फसली व घरचा रस्ता सोडून त्या नवख्या इसमाबरोबर तेथून जवळच असलेल्या एका किंचित् बाजूच्या बागेत गेली.

ती जांभळाची बाग या पोलिस ठाण्यापासून जवळच, पण रहदारी-पासून किंचित् अलग होती. त्यांतून ही भर उन्हाची वेळ.

अर्थात्च बागेंत विभावती व तो उचल्या याखेरीज दुसरे कोणीच नव्हतें.

त्या इसमानें काहीं जाभळे काढून विभावतीच्या हाती देत म्हटले–

" हीं घे बाळ जाभळ तुला. या दगडावर बैस अन् खा. तोंपर्यंत मी आणखी आणून देतों हं ?"

असें म्हणून तो इसम बागेंत जाण्यासाठी वळला. पण इतक्यात काही आठवल्यासारखें करून तो मागें परतून विभावतीस म्हणाला—

" पण बाळ, तूं तिथ एकटीच बसणार ? तुझ्या हातातले ते चिल्वर अन् गळयांतली हंसळी तेवढी दे माझ्याजवळ. नाहीं तर एखादा चोर ती पळवून नेईल बघ."

पण साध्या बोलानें दागिने देण्यास विभावती तयार झाली नाहीं. तेव्हां तो कठोरहृदयी पुरुष तिच्यावर रागानें खेकसला—

" चल काढ दागिने मुकाट्यानं. नाही तर ठार मारीन बघ..."

या दरडावणीनें विभा बिचारी भेदरून गेली ! काय करावें हें तिला सुचेना. तिच्या या बावरलेल्या अवस्थेचा फायदा घेऊन त्या लफंग्यानें तिच्या हातातील व गळयांतील दागिने खुशाल लाबविले !

सुंदर हिरवळ पाहून आरामानें अंग टाकावें तों हिरवळींत लपून राहिलेल्या जिवाणूनें अचानक दंश करावा, तशीच विभावतीची अवस्था झाली. तिला काय करावें तेंच सुचेना.

या गोंधळलेल्या अवस्थेंतून भानावर येऊन झालेल्या घटनेचा अर्थ

तिच्या लक्षांत आल्यावर ती असहाय्य बाला आक्रोश करूं लागली. पण तिच्या रुदनाचा पहिला स्वर तिच्या कंठांतून बाहेर पडण्यापूर्वींच तो लफंगा त्या बागेंतून बाहेर पडून पसारहि झाला होता !

तिचा रुदनस्वर काही वेळानें त्या बाजूनें जाणाऱ्या एका सद्-गृहस्थाच्या कानी पडला. त्या भल्या गृहस्थानें तिची चौकशी करण्याचा यत्न करून पाहिला. पण रडण्यापलीकडे विभावतीच्या तोंडून दुसरा स्वरच उमटेना! घर चुकलेली मुलगी असावी या कल्पनेनें त्या गृहस्थानी तिला पोलिस ठाण्यावर आणून पोंचविली होती.

विभावतीच्या तोंडून बाहेर पडलेली वरील आशयाची हकीकत संपते न संपते तोंच तो मुसलमान पोलिस एकदम ओरडला—

"या अल्ला! त्या राम्या रामोशाचंच हे काम; शकाच नको! त्यान आजपर्यंत सात-आठदा असल्या चोऱ्या केल्या आहेत त्या भागात. आमच्या खात्याची त्याच्यावर नजर आहेच. आता आपण असं करा साहेब," माझ्याकडे वळून तो पोलिस बोलला, "आपण पालक म्हणून एक फिर्यादी–अर्ज द्या. मग आम्ही पाहून घेऊं पुढचं सारं. कुठं जातोय् तो राम्या...!"

त्याची बडबड मारुतीच्या शेपटासारखी आणखीहि वाढत राहिली असती, पण मध्येंच मीं ती तोडून टाकीत म्हटलें—

"पण मी या मुलीचा पालक नाही!"

"म्हणजे? ही मुलगी कुणाची आहे तर?"

"बन्याबापू दंडके सावकाराची." मी उत्तर केलें. "आतां मी असं करतों, मीं या मुलीला घरीं घेऊन जातों. मी तिच्याच घरीं भाडेकरी आहें. अन् बन्याबापूंना सारी हकीकत सागतो. मग पुढं त्याचं तें ठरवतील काय करायचं तें."

असे म्हणून मी विभावतीचा हात धरून चालूं लागणार तोंच तो पोलिस म्हणाला—

"जरा थाबा साहेब. आपलं नांव, गाव, या मुलीचं नाव वगैरें मला लिहून घेतलं पाहिजे. बन्याबापूसाहेबाचाहि या कामी मला जबाब घेतला पाहिजे. तेव्हा आपण मिळूनच जाऊं तिकडे."

नंतर रीतसर माझे नाव, गाव, मुलीचें नाव वगैरे लिहून घेण्याचा विधि आटोपल्यावर विभावतीस घेऊन तो पोलिस व मी बन्याबापूंच्या घरी जाण्यास निघालो.

विजेच्या पंख्यानें वारा घेत बन्याबापू पलंगावर लोळत पडले होते. मी खोलीत जाताच त्यानी कपाळावर तिरस्कारदर्शक आठी घालून काहीशा बेपर्वा स्वरात विचारलें—

"काय हो, कां आलात ह्या उन्हाचे ?"

"थोडी भानगड आणली आहे आपणाकडे..."

"कसली भानगड ? का लग्न ठरवून आलांत कर्ज मागायला बायकोला दागिने करण्यासाठीं ? ह्यः ह्यः ह्यः !"

आपल्याच कोटीवर बेहद्द खूष होऊन बन्याबापू खो खो करून मोठमोठ्यानें हसूं लागले; पण इतक्यात रडणाऱ्या विभावतीमागून पोलिसानें खोलीत प्रवेश केलेला पाहून, भरधांव निघालेल्या गाडीचा कणाच मोडून पडावा, तसें सावकराना झालें असावें असे दिसलें.

यमपुरींतील कळसूत्री बाहुलीप्रमाणे ते एकदम उठून ताठ बसले. त्यांचा हंसण्याचा इमला पार जमीनदोस्त होऊन गेला. किंचित्

त्रासाच्या व किंचित् भीतीच्या संमिश्र स्वरांत बन्याबापू माझ्याकडे पाहत विचारते झाले—

" काय हो बाबुराव, ही काय भानगड आणलीत—? "

दागिने चोरीस गेल्यामुळें माराच्या भीतीने बापापुढे येण्यास भिणाऱ्या विभावतीस आपल्याजवळ ओढून मी म्हटलें—

" विभाच्या हातातले बिलवर व गळयातली हसळी कोणी भामट्यानं चोरून नेली म्हणून...... "

" काय !–चोरून नेली ? " बन्याबापू ओरडले. " केव्हा न् कशी... ? "

घडलेली सर्व हकीकत मी बन्याबापूंना थोडक्यात सांगितली. ती ऐकून झाल्यावर बन्याबापूंचा राग उसळून वर आला. आणि त्या भरात त्यानी एक छोटेंसें व्याख्यान दिलें—

" पाहिलंत बाबुराव ? हें असं कधी तरी होईल, हें मी आगाऊच भाकीत केल होतं. रोज मी घरात बजावून सांगत होतों म्हणून बरं, की मुलाना दागिने घालून एकटं दुकटं घराबाहेर सोडूं नका म्हणून. पण ऐकतो कोण ? गेले दागिने चोरीला तर दुसरे मिळतातच ! मग कशाला बायका काळजी करतात ? पण एक दागिना करून आणायला आम्हा पुरुषांचं किती रक्त आटतं याची बायकांना काय पर्वा ? आता हेंच पहा. दोन बिलवर अन् एक हंसळी म्हणजे गेले ना साठ-पाऊणशें रुपये चोरापोरी ! तेच पैसे व्याजी लावले असते तर महिना रुपया दोन रुपये व्याज आलं असतं...पण, मग या मूर्ख बायकाच्या हौशी कशा भागल्या असत्या नवऱ्याच्या जिवावर ?...आणि हीं कारटीं म्हणजे तर मला जिवंत जळवाच आहेत...काय ग गधडे ! तुला नव्हती का अक्कल काही... ? "

पण बन्याबापूंचें वाक्य ऐकण्यास विभावती तेथें थाबलीच नाही. बापाच्या क्रुद्ध नजरेची संक्रात आपल्याकडे वळलेली पाहतांच ती तीरासारखी तेथून पळून गेली. तिच्या पळत्या मूर्तीकडे पाहत बन्याबापू उद्गारले—

"पहा कशी पळून जाते कारटी ती? छे, छे, दागिन्यांऐवजी या छळवादी कारटीलाच नेली असती तर सुटलों असतों एका पोरीच्या जाचातून!"

नंतर पोलिसाला व बन्याबापूना पुढील तजविजीची व्यवस्था करण्या-बद्दल सागून मी माझ्या कामावर निघून गेलों. जाता जाता विभावतीची आई घरात आहे की काय ह्याची चौकशी केली. पण ती कोठें बाहेर गेल्याचें समजलें. तेव्हा संध्याकाळी कामावरून आल्यावरच तिची गाठ घ्यावी असा विचार करून मी घाईघाईनें कामावर निघून गेलों.

उशीर झाल्यामुळे मला वरिष्ठाच्या शिव्या खाव्या लागल्या हें वेगळें सांगणे नकोच! शिवाय संध्याकाळी मला रोजच्यापेक्षा अर्धा तास अधिक काम करावें लागलें. त्यामुळें साहजिकच घरी येण्यास मला नेहमीपेक्षा थोडा वेळ लागला.

घरी येताच विभावतीच्या आईची गाठ घ्यावयाची असा माझा बेत होता. त्यामुळें मला आज उशीर झाला, तेव्हा ती नेहमीप्रमाणें देवदर्शनास गेली असेल असें मला वाटलें. पण पाहतों तों ती घरीच होती. इतकेंच काय, पण ती मोठ्या उत्सुकतेने माझीच मार्गप्रतीक्षा करीत होती.

मी जाताच तिने म्हटले—

"दुपारची सगळी हकीकत सागा पाहूं मला नीटपणं. तुमच्या वाटेकडे मी केव्हांची डोळे लावून बसलें होतें."

मी घडलेली सारी हकीकत जशीच्या तशी तिला निवेदन केली. ती शांतपणें ऐकून घेतल्यावर ती कृतज्ञतादर्शक स्वरात मला म्हणाली—

"बर झालं, देवानं कृपा केली म्हणून तुम्हाला आज त्या पोलिस-ठाण्याकडून जायची बुद्धि झाली. तुमच्यामुळं आज विभावरचं संकट टळलं."

आत्मस्तुतीचा हा विषय आणखी ऐकण्याचें टाळण्याच्या हेतूनें मी विषयांतर करून विचारलें—

"त्या गेलेल्या दागिन्याबाबत काय करणार आहेत साहेब? काहीं कळलं का? पोलिसांत फिर्याद दिली तर परत मिळायचा संभव आहे."

किंचित् उदास खिन्नतेने हसून ती विषण्ण स्वरात बोलली—

"तें मला कस कळणार? घरी आल्यावर मला खूपच बोलून घ्यावं लागल. मी म्हणतें, गेले दागिने तर गेले, त्यात काय एवढं मोठंसं? साठ रुपड्या गेल्यानं याना भीक का लागणार आहे? नदीचं कुडचाभर पाणी नेलं म्हणून ती काही कोरडी पडत नाही! पण त्यांचा स्वभावच भेला तस्सा. चागली सोन्यासारखी पोर परत मिळाली त्याचं त्याना काहीच कसं वाटत नाही? त्या चोरानं म्हटल्याप्रमाणं पोरीचा जीव घेतला असता तर...!"

पण त्या भयद कल्पनेनेंच तिचें अंग झरकन् थरारलें. तिला तें वाक्य पूर्ण करवेना. तिच्या डोळयांतून दोन अश्रु पडले व तिनें डोळयास पदर लावला!

# दुःख देणारें सुख

स्टोव्ह पेटवून ताई माझ्यासाठी शिरा व चहा करीत होती, आणि तिच्या पलीकडेच एक पाट टाकून मी बसलो होतों. माझ्या रजेबद्दल, प्रवासाबद्दल, आगगाडीतील त्रासाबद्दलच्या गोष्टी मी तिला सांगत होतों. बरेच दिवसांनी आम्हा बहीणभावंडांची गांठ पडलेली असल्यामुळें आमच्या गप्पांना बराच रंग चढला होता.

इतक्यांत स्वयंपाकघराच्या दाराच्या दिशेनें शब्द ऐकूं आले—

" ताई, मी आलें."

मी मागें वळून पाहिलें. एक दोन-अडीच वर्षांची बालिका दारातून डोकावून पाहत होती.

तिच्या पाणीदार डोळ्यांत किंचित् खोडसाळपणाची चमक असल्यामुळें तिचा चेहरा पहाताक्षणींच मोहक वाटे.

मी चटकन् उठून दाराशी गेलों आणि त्या मुलीला उचलून घेण्या-

साठी हात पसरले. पण माझ्यासारख्या अनोळखी माणसाचा हा लघळपणा तिला पसंत पडला नसावा असें दिसलें. कारण ती किंचित् भयशंकित होऊन मागे सरली व मदतीसाठी तिनें हाक मारली—

"ताईऽ ताई..."

इतक्यात ताई तिच्या मदतीला धांवली. तिनें तिला उचलून घेतलें व मला उद्देशून म्हटलें—

"नको रे तिला उगीच रडायला लावूं. एकदां बाईसाहेबानी भोकाड पसरलं, की मग कोणालाच चैन नाही पडूं द्यायची. होय ना बडा?"

शेवटचा प्रश्न अर्थात्‌च त्या मुलीला उद्देशून केलेला होता. पण त्या छोकरीचें ताईच्या प्रश्नाकडे लक्ष होतें कुठें? वाटेंतच गाठूं पाहणाऱ्या पावसाचा मार चुकवून घरीं सुरक्षितपणें पोंचल्यावर, घराच्या सज्जात उभें राहून बाहेर पडणाऱ्या पावसाचें स्वस्थपणाने निरीक्षण करावें तद्वत् ताईच्या सुरक्षित बालेकिल्ल्यात गेल्यावर ती छोकरी हळूच तिरप्या डोळ्यानी मजकडे न्याहाळून पाहूं लागली. मी नजरेला नजर दिली, की लाजून चटकन् आपली दृष्टि दुसरीकडे वळवावी आणि नजर आपल्याकडे नाही असें पाहून पुन्हा माझ्याकडे तिरप्या नजरेनें निरखून पाहूं लागावें, असा तिचा खेळ सुरूं झाला. जणूं हा कोण पाहुणा आपल्या घरी आला असावा याचा ती शोध घेत होती.

तिच्या या मिस्किल बाललीलाचें मला मनापासून कौतुक वाटलें. म्हणून मी बहिणीला म्हटलें—

"ताई, ही भाऊसाहेबाची का ग मुलगी?"

"होय. कशी काय आवडली तुला?"

"उत्तम! फार हशार दिसते पोरगी, नाही?"

"फारच हुशार आहे हो! तिच्या वयाच्या मानानं तिला इतकं

कांहीं समजतंय् म्हणतोस, आणि बोलते तरी किती! आम्ही जें कांही बोलूं ते बरोब्बर बोलते सगळं काही!"

असे म्हणून ताईने तिला विचारले—

"बंडा, तुझी आठवण कुणी काढली बाई?"

एकदा माझ्याकडं व एकदा ताईकडं आळीपाळीनें ती पोर पाहूं लागली. जणूं परक्या पाहुण्यादेखत नेहमीप्रमाणे प्रश्नाना उत्तरें द्यावीत किंवा कसें, या संशयात ती पडली होती. तेव्हां ताईच तिला धीर देण्यासाठी म्हणाली—

"अग, लाजतेस काय त्याला? तुझा मामा ना तो? मामाला सांग ना तुझी आठवण कोणी काढली?"

या ताईच्या आश्वासनाने जणूं तिला धीर आला. ती तिरप्या नजरेने मजकडे पाहून पुटपुटली—

"बाप्पानं—"

"बाप कोणाचा बाई?" ताईने दुसरा प्रश्न विचारला.

"माझा!" स्वतःच्या छातीवर आपल्या चिमकुल्या वाम कराची करांगुलि टेकून तिने उत्तर केले.

या तिच्या उत्तरानें आणि कृतीनें मला हसूंच कोसळले. ताईहि कौतुकानें हसू लागली. आणि आम्हा दोघांना हसताना पाहून ती मुलगीहि हसूं लागली.

आता ती थोडी धीट बनली होती. त्यामुळें ताईनें विचारलेल्या पुढच्या प्रश्नाना तिनें पटापट उत्तरें दिली—

"तुला भाऊ काय म्हणतो बाई?"

"सुधाताई."

"आणि इदी काय म्हणते?"

" सुधा."

" आणि सीताराम काय म्हणतो ? "

" काला लोट्या. " सुधेनें आपल्या बोबड्या भाषेंत उत्तर केलें.

" कुसुमला हाक मार बघूं ? "

" कुतूम."

" मोदक कर बाई, मामाला मोदक करून दाखव पाहूं ? "

लगेच सुधेने गाल फुगवून व तोंडाचा चंबू करून मोदक करून दाखविला. तिच्या या बाल लीलांनी माझ्या हास्याला एकसारखें भरतेंच येत होतें.

इतक्यात आमचें चहापान आटोपलें आणि आम्ही सुधेसह दिवाणखान्यात येऊन बसलों.

दिवाणखान्यात येताच कोपऱ्यातलि वेताच्या मोठ्या खुर्चीवर ताईनें सुधेला बसविलें आणि म्हटलें--

" ऐटीत बस ह बडा! ऐटीत बस खुर्चीत. "

ताईचे शब्द पुरते बाहेर पडतात न पडतात तोंच सुधेनें आपले दोन चिमकुले हात खुर्चीच्या हातापर्यंत ताणविले. खुर्चीच्या पाठीला डोके टेकवून तिनें आपले पाय पसरले, आणि ताईकडे पाहून मिस्किलपणें हंसण्यास सुरुवात केली.

आतां मात्र मन आवरणें मला शक्य झाले नाही. एकदम उठून मी सुधेला उचलून घेऊन तिचे चारपाच मुके घेतले.

माझ्या या जुलुमानें ती बिचारी भेदरून गेली आणि तिने रडण्यास सुरुवात केली.

अर्थात्‌च तिला मुकाट्यानें खाली सोडणें मला भाग झालें. एडतच ती ताईकडे गेली.

ताईनें तिला उचलून घेतले, व तिच्या डोळयाचें पाणी आपल्या लुगड्याच्या पदरानें पुशीत पुशीत म्हटलें—

" उगी, उगी हं बाळ. आता आपण ' बाइबाइ ' लावू या ह."

ताईच्या या शब्दानी सुधेचें रडें अजिबात थाबलेलें पाहून मला नवल वाटले. मी ताईला विस्मयानें विचारले—

" हें ' बाइ बाइ, ' काय प्रकरण आहे ग ? "

" अरे, " बाइ बाइ, म्हणजे फोनोग्राफ." ताईने खुलासा केला. " रानारानात गेली बाई शीळ " ही प्लेट ऐकून ती फोनोग्राफला ' बाइ बाइ ' म्हणते. "

ताईनें फोनोला किल्ली दिली आणि प्लेटीचा अल्बम हाती घेऊन सुधेला विचारलें—

" काय लावूं या बाई गाणं ? "

" डोयेऽऽ " सुधेनें बारीक आवाजात तान घेत उत्तर केलें.

" डोयेऽऽ " म्हणजे ' डोळे हे जुलमि गडे ' फोनोवर सुरू झाले. सुधा त्या गाण्यांत एखाद्या समजूतदार मोठ्या माणसासारखी रंगून गेली होती. पद संपताच ती म्हणाली—

" पेम... "

ताई माझ्याकडे पाहून कौतुकानें म्हणाली—

" पाहिलंस, कशी हुशार आहे चिमुरडी ती ? या प्लेटीच्या मागें 'प्रेम कोणीही करीना ' हें गाणं आहे; तेवढं कसं बरोबर लक्षात ठेवलंय तिनं. "

तें पद फोनोवर सुरु असताच ताईच्या घरचा शिपाई कसलेसें एक

पुडकें घेऊन आला. मला पाहून ' केव्हा आलात ' वगैरे दोन-चार औपचारिक प्रश्न विचारून त्यानें तें पुडकें माझ्या हाती देऊन म्हटलें—

" हें पोस्टातून रजिस्टरनं पार्सल आलं आहे सुधाताईंच्या नावाचं. या कागदावर तेवढी सही करून द्या. "

मी खिशातून फाउंटन पेन काढून पोस्टल रिसीटवर सही करून दिली; गडी रामराम करून निघून गेला.

मी ते पार्सल जिज्ञासाबुद्धीने लागलीच फोडून पाहिलें. फोनो बंद करून ताईहि पार्सलात काय आहे तें पाहण्यासाठी माझ्याजवळ येऊन उभी राहिली होती. सुधा ताईच्या पदराला धरून तिच्या पायाशी घुटमळत होती; व मधून मधून माझ्याकडे व त्या पार्सलाकडे कुतूहल-बुद्धीनें पाहत होती.

मी पार्सल फोडून पाहिले तों आत पातळ मलमलीचे सुंदर छोटे छोटे शर्ट्स होते. ते पाहून मीं म्हटलें—

" आं ? हे तर मलमलीचे शर्ट आणि हे कशाला आणि कुणी पाठविले ? "

" पाहूं, पाहू दे मला. " ताईनें अधीरपणें माझ्या हातातून ते जवळ जवळ हिसकावूनच घेतले. आणि थोडा वेळ त्यापैकी एकदोन शर्ट्स् नीट न्याहाळून पाहून ती सुधेला उद्देशून म्हणाली—

" हे बघ बंडा, तुझ्या काकांनी तुला शर्ट पाठवलेत. बघूं या बर तुझ्या अंगात घालून; ये."

सुधेच्या अंगातला चॉकोलेट रंगाचा फॅशनेबल फ्रॉक काढून नवीन आलेल्यापैकी एक शर्ट तिच्या अंगात घालीत असता ताई मला सांगूं लागली—

" परवाच्या दिवशी हिचे अप्पाकाका आले होते इथं हिला पाह्यला.

त्यांना मी सहज कुठं म्हटलं, की सध्या उन्हाळ्याचे दिवस आहेत, तेव्हां हिच्या अंगात घालायला पातळ मलमलीचे कपडे हवे होते. हे जाड कापडाचे फ्रॉक्स नी झबली ती मुळीच अंगात घालू देत नाहीं. एवढं मी म्हटलं मात्र, अप्पाकाकानीं ताबडतोब आपल्या शिष्याला पत्र घातल, मलमलीचे अर्धा डझन शर्ट पाठवून द्यायला. अगदीं परवाची गोष्ट ही आणि आज आपले शर्ट तयार !"

शर्ट अंगात घालून सुधा खरोखरीच मोठी ऐटबाज चिमखडी दिसत होती. त्या तिच्या मोहक मूर्तीकडे पाहत मी म्हटलें—

"अरे वा, सुधावर तिच्या अप्पाकाकांचं प्रेम बरंच दिसतं आहे !"

"ते काही विचारूं नकोस." ताई उत्साहानें म्हणाली, "तस पाहिलं तर अप्पाकाकाचा आणि सुधाचा नात्याचा असा संबंध काहींच नाही. सुधेच्या वडिलाचे—भाऊसाहेबाचे ते एक केवळ स्नेही. पण रक्तामांसाची नात्याची माणसं करीत नाहीत इतके अप्पाकाका या पोरीवर प्रेम करतात. त्याचा स्वभावच असा आहे. एकदां त्यानी एखाद्याला आपला म्हटला, की त्यासाठी हवं तें करायला त्याची आपली सदाची तयारी. एवढे अप्पाकाका श्रीमंत, पण सुधेसाठी आम्हा गरिबांच्या घरची मीठभाकरीहि गोड करून घेतात."

"इथं ते वरच्यावर येतात वाटतं ?" मी मध्येच विचारलें.

"होय. सुधेला पाहण्यासाठी येतात दोन-अडीच महिन्यानीं आणि येतात तेव्हा दर खेपेला सुधेसाठी कित्ती कित्ती खायला घेऊन येतात. नाना प्रकारचे जॅम्स्, चाकोलेट, बिस्किटें—हज्जार जिन्नसा आणतात बरोबर. सुधेसाठीं निरनिराळ्या किंमती कापडाचे किती किती तऱ्हा-तऱ्हाचे कपडे त्यानी शिवून पाठविले आहेत ! दोन मोठ्या ट्रंका नुसत्या सुधेच्या कपड्यांनीच भरून गेल्या आहेत !"

ताईनें सुधेच्या कपड्याच्या ट्रंका उघडून त्यातील निवडक माल मला दाखविण्यास सुरुवात केली. त्या चिमुकल्या मुलीसाठी केलेल्या कपड्यामध्यें मला जितक्या फॅशन्स् पाहावयास मिळाल्या तितक्या मीं यापूर्वी एकत्र अशा कोठेंच पाहिलेल्या नव्हत्या. क्षणभर मला सुधेच्या वैभवाचा हेवा करावासे वाटल्यावाचून काही राहवलें नाही.

" हे सर्व कपडे अप्पाकाकानीच दिले का ?" काहीतरी विचारा-वयाचें म्हणून मी विचारले.

" हो. आणखी आजच्यासारखे कपडे वरच्यावर पाठवीत असतातच एकसारखे ! आम्हीच नको म्हणतो. हो, इतके कपडे तिला घालायचे तरी केव्हा ? "

" आणि तिचे वडील नाहीं का काही पाठवीत आपल्या लाडक्या लेकीसाठी ? " ताईच्या पाठीवर रेलून पडलेल्या सुधेकडे पाहत मी विचारलें.

" कोण ? भाऊसाहेब का ? " नव्या वसंतऋतूबरोबर वृक्षाना नवा बहर यावा तद्वत् नवा विषय मिळताच ताईसाहेबाच्या जिभेला जणूं नवचैतन्य प्राप्त झालें.

ती उल्हासाने सागू लागली--

" वा, त्यानी सुधेसाठीं इतक्या जिनसा मुंबईहून पाठविल्या आहेत, की त्या गर्दीमुळं माणसाना आता आमच्या घरात राहायला जागाच नाहीं असं झाल आहे. ये, तूंच बघ ये स्वतः. "

भाऊसाहेबानी आपल्या एकुलत्या एक मुलीसाठीं मुबईहून पाठवि-लेले नानाप्रकारचे विलायती खेळ, लहानमोठ्या बाहुल्या, विविध तऱ्हेची मुलाची वाद्ये वगैरे जिन्नस एकेक मला दाखवीत असताना ताईची तोंडपाटिलकीहि चालूंच होती. प्रत्येक जिनसेबद्दल ती कांहीं ना काहीं ' ऐतिहासिक ' माहिती मला ऐकवीत होती. सुधाताईच्या या

खेळांनी दोन मोठाले पेटारे अडवून टाकले होते. ते पाहून मी म्हणालों—

" सुधेच्या या सामानासाठी तुम्हाला एक घरच भाड्यानं घ्यायला लागणार असं दिसतंय ताई ! "

" अरे इतक्यानं कुठं भागतय ? पलीकडच्या खोलीत चल. अजून तुला दाखवितें सुधेचे प्रजाजन. या पाहिल्यास बाबागाड्या, दोन चार प्रकारच्या! एक ही सुधाताईंना बसवून बाहेर फिरायला न्यायची, अन् दुसरी ही घरांतल्या घरात फिरवायची. आहे की नाही गंमत ? "

इतक्यात मागून आलेली सुधा पलीकडच्या बाजूस जाऊन तेथें असलेल्या झोपाळयाच्या कठड्याला धरून " ताई, ताई..." अशा हाका मारूं लागली.

ताई झटकन् पुढें झाली आणि तिच्या मनातला भावार्थ ओळखून सुधाला घेऊन झोपाळयावर बसली.

मीहि झोपाळयाच्या दुसऱ्या बाजूला जाऊन बसलो आणि ताईला विचारलें—

" अरे वा, तुम्ही झोपाळा कधी पैदा केलात ? "

" सुधेच्या वडिलांनी पाठविला आहे हा झोपाळा मुंबईहून. एकदा आम्ही सुधाला घेऊन एक ठिकाणी गेलों होतों आपलीं सहज बसायला. तिथल्या झोपाळयावर सुधा बसली नि कांहीं केल्या उतरेनाच मुळी ! लागलीच भाऊसाहेबानी सुधेसाठी हा झोपाळा खरेदी करून पाठवला."

सुधेच्या पाठीवर प्रेमानें शाबासकी देत मीं म्हटलें—

" वा, सुधा ही मोठी शिकदर नशिबाची मुलगी दिसते. मनात येईल तो जिन्नस क्षणात घरात येऊन पडतो आहे. होय ना, सुधा ?"

" नशिबवान् तर खरीच." ताई सुधेला हृदयाशी कवटाळीत म्हणाली, " अगदीं एखाद्या राजकन्येसारखी बडदास्त ठेवली जात आहे तिची. पण हें सगळं पाहायला तिची आई तेवढी जगूं नव्हती का ? ...तिला बिचारीला आपल्या मुलीचे सुखसोहळे पाहून किती म्हणून आनंद झाला असता...पण नशिबातच नव्हतं तिच्या हे सुख—"

सुधेच्या बाललीलानी व तिच्या आभूषणानी आतापर्यंतचें वात्सल्य-युक्त आनंदी वातावरण ताईच्या या उद्गारानी एकदम लुप्त झालें. त्याऐवजी एक प्रकारचा खेदमिश्रित उदास भावनेचा पगडा आमच्या अंतःकरणावर बसला. सुधेच्या आईच्या आठवणीनें ताईचे डोळे पाणावले.

मलाहि दोन वर्षांपूर्वीची ती दुःखपूर्ण कथा सारी जशीच्या तशी आठवली आणि त्या आठवणीनें मन किंचित् जड व उदास झालें.

सुधेला जन्म दिल्यानंतर लौकरच मेंदूच्या विकारानें तिची आई इहलोक सोडून गेली होती. आणि जातांना तिनें आपलें एकुलतें एक अर्भक आपल्या चुलत बहिणीच्या— माझ्या ताईच्या— ओटीत टाकलें होतें. तेव्हापासून ताईनें अपत्यनिर्विशेष प्रेमानें सुधेचा प्रतिपाळ केला होता.

आकाशात विविध आकृतीचे ढग एकामागून एक पुढें सरकत जावेत, तद्वत् हे सारे प्रसंग माझ्या चित्तचक्षूंपुढून एकामागून एक जाऊं लागले.

या खेदपूर्ण विचारानी भारावल्यामुळें मी सुधेकडे एक करुण दृष्टिक्षेप करून जड स्वरात म्हटलें—

" विधिघटना किती विचित्र आहे बघ ! सर्व ऐहिक सुख सेवेला सज्ज असून बिचारी सुधा मातृसुखाला तेवढी आचवली. कोकिळेच्या पिलाप्रमाणं तिला दुसऱ्याच्या घरट्यात वाढावं लागत आहे. "

" हऽऽ ! " लांब सुस्कारा सोडून ताईने खेदजड असा शब्दोच्चार केला. या दुःखद विचारानी तिच्या हृदयात होणारी कालवाकालव तिच्या त्या जड स्वरात स्पष्टपणे व्यक्त होत होती !

हें गंभीर वातावरण थोडे तरी पालटावें म्हणून मी मुद्दाम विषय बदलण्याच्या दृष्टीने म्हणालो—

" पण ताई, तू तिला अगदी सख्ख्या आईसारखीच संभाळली आहेस की. तुलाहि पण तिचा फार ळळा लागलेला दिसतोय मला."

" ळळा रे कसा न लागेल ? " ताई पदरानें आपले डोळे टिपीत म्हणाली, " जन्मापासून तर ती माझ्याजवळ आहे आज दोन वर्षं. आई वेगळी पोरगी; आणि लाघवी तर इतकी आहे, कुणालाहि ती आवडेल. आमच्या घरात तरी कुठ लहान मूल खेळल आहे इंदी मोठी झाल्यापास्नं ? खर सांगायच म्हणजे सुधा घरी आल्यामुळ आमच्या घराला कशी शोभा आली आहे..."

ताईनें सुधेला आणखी हृदयाशी कवटाळलें. तिच्या अंतःकरणा-तील सुप्त वात्सल्याला सुधेच्या आगमनाने वाट मिळाली होती. आणि त्यामुळेंच सुधा आल्यापासून तिला घरी नवा आनद अनुभवण्यास सापडत होता. जणूं तिच्या हृदयातील अपत्याकांक्षेची खाच सुधेच्या आगमनानें भरून निघाली होती !

" सुधेच्या आगमनानं तुझ्या घरात सुख आणि आनंद पुन्हा खेळूं लागला, नाही ? " ताईच्या मनातील खेदविचाराना पूर्णविराम देण्याच्या हेतूनें मी विचारलें.

"मुलगी चांगलीच खेळती बोलती झाली." ताई म्हणाली, "प्रकृतीनंहि नीट सुधारली, याचा आम्हाला आनंद होणार नाही तर कोणाला होईल ? येणारे जाणारे सर्व लोक तिचं कोडकौतुक करतात, वडलाच्या प्रेमाचा तर ती ठेवाच होऊन बसली आहे. तिची हरेक इच्छा पुरवण्यासाठी सर्वजण नेहमी तत्पर असतात. हें सगळं खरं; पण तिला सुख व्हाव म्हणून सर्वजण झटतात हें तिचं भाग्य पाहायला तिची आई हवी होती, असं मला आपल एकसारख वाटत. तिच्याइतका याचा आनद दुसऱ्याला कसा वाटेल ? सुधा हुशार आणि लाघवी आहे त्यामुळ तिच्यापासून आम्हाला घरात किती तरी आनंद व सुख मिळत खरं. पण त्यामुळच तर तिच्या आईची वरच्यावर आठवण होते आणि वाटत, की हे सारे सुखसोहळे पाहायला तिची आई हवी होती."

विस्मृतीची नाजुक खपली निघाल्यामुळें अतःकरणात उत्पन्न झालेली कळ ताईच्या डोळयावाटे अश्रुरूपाने पाझरूं लागली !

सुधेला अगदी घट्ट कवटाळून अश्रु ढाळणाऱ्या ताईकडे अधिक वेळ पाहवेना म्हणून मी तेथून उठून पलीकडच्या दालनात निघून गेलों !

# पतित

हिमालयाचे पोटांतून अग्निवर्षाव झाला असता तरी मला वाटलें नसतें इतकें आश्चर्य, रंगरावाचा तो अवतार पाहून वाटलें. माझ्या डोळयावर माझा विश्वास बसेना. मी स्वप्नात तर नाही ना, अशी देखील एक शंका डोक्यांत येऊन गेली. रात्र बरीच झालेली होती; कदाचित् डोळयांवर झोपेचा अंमल बसत चालल्यामुळे डोळयांना असें मलनेच दृश्य दिसत असावें असें मला वाटलें. दोन्ही हातांच्या अंगठ्यांजवळील बोटानीं मी दोन्ही डोळे चोळले, आणि नंतर रंगरावांकडे नजर फेकली.

पुन्हा तेंच दृश्य दिसलें!

मी रंगरावाच्या अगदी जवळ जाऊन त्याच्या खुर्चीमागें उभा राहिलों. एखाद्या समाधिस्थ योग्याप्रमाणें रंगराव आपल्याच नादात अगदी गुंग झालेला होता. इतका की, खोलीचें नुसतेंच लोटून

घेतलेलें दार उघडून मी आत आलो ते त्याच्या ध्यानीहि आलें नाहीं. पुष्कळ दिवसात बिजागऱ्याना तेल दिलेले नसल्यामुळे मी दार उघडले तेव्हा करकर असा झालेला आवाजहि त्याने ऐकला नसावा. मी 'ए रंगराव' म्हणून मोठ्यानें हाक मारण्याच्या अगदी बेतात होतो; पण त्याचा तो 'अवतार' पाहून माझी जीभ तोंडातल्या तोंडात घोटाळली व त्याच्या पाठीवर थाप देण्याच्या उद्देशाने पवित्र्यांत उगारलेला हात मारुतरायाच्या हाताप्रमाणें वरच्यावरच राहिला.

दाराकडे पाठ करून रंगराव आपल्या लिहिण्याच्या मेजाशीं लोखंडी खुर्चीवर बसला होता. नेहमीप्रमाणेंच सर्वत्र अस्ताव्यस्त पसरलेल्या सामानामुळें खोलीला एखाद्या नाटकमंडळीच्या बिऱ्हाडाची कळा आलेली होती. टेबलावर एक स्टॅंड मंदपणे तेवत होता. कुत्र्याच्या भेसूर भुकण्याला घुबडाच्या भयाण घूत्कारानें साथ द्यावी त्याप्रमाणे बाहेरील गडद अंधाराला त्या दिव्याच्या अर्धवट उजेडाने अधिकच भीषणता आणली होती. त्या दिव्याच्या उजेडात रंगराव हातात कसला तरी फोटो घेऊन त्यावर स्फुंदून स्फुंदून अश्रु ढाळीत आहे, असे मला दिसलें. या शोकसागरात तो इतका बुडून गेला होता, कीं त्याला बाह्य जगाचें यत्किंचित्‌हि भान उरलेलें नव्हते.

मी थोडेंसें पुढे जाऊन पाहिलें. रंगरावाच्या हातांतील फोटो मंदाकिनीवहिनींचा होता. वहिनींना मरून आतां दहा वर्षे होऊन गेली होती. इतक्या अवधीत रंगरावाने आपल्या मृत पत्नीबद्दल कोणाजवळ चुकून ब्रहि काढला नव्हता. जणूं काय मंदाकिनीची व त्याची ओळखहि नव्हती. त्याच्यादेखत दुसऱ्या कोणी वहिनीं-संबंधी विषय काढल्यास तो प्रयत्नपूर्वक तो विषय बदलीत असे, असाच आजपर्यंतचा माझा व इतराचाहि अनुभव होता. आणि

वहिनींच्या मृत्यूनंतर एक-दोन वर्षांत रंगरावानें जो जीवनक्रम पतकरला होता, त्यावरून पाहता त्याचे वरील प्रकारचें वर्तन सुसंगतच होतें असें सर्वांस वाटे.

रंगरावाच्या वाह्यात वर्तनाबद्दल सर्वजण त्याचा उघड उघड तिरस्कार करीत; पण त्यानें आपले वर्तन सुधारण्याचा विचारहि कधी मनात आणल्याचे मला माहीत नाही. उलट हलवून खुंटा बळकट व्हावा त्याप्रमाणे आता तर तो मुलखाचा छट झाला होता. रंगरावाच्या अलीकडील या वर्तनक्रमाची मलासुद्धा किळस येई व या पतित आयुष्यापासून त्याने दूर जावें म्हणून मी खटपटहि करीत असे, पण अजूनपर्यंत तरी मला या बाबतीत यश येण्याचें चिन्ह दिसत नव्हते.

अशा स्थितीत वहिनींचा फोटो समोर ठेवून मनसोक्त अश्रु ढाळणाऱ्या रंगरावाला पाहून सापाच्या तोंडून विषाऐवजी अमृत बाहेर पडावे तसें मला वाटलें. दहा वर्षांत ज्या गृहस्थाने मृत पत्नीचें नावहि मुखातून काढलें नाही, त्याला आज अशा अनपेक्षित स्थितीत एकाएकी पाहून, रखरखीत वाळवंटाचें भूकंपाच्या धक्क्यानें सुदर सरोवर झालेलें दृष्टीस पडावें तसें मला वाटलें. काही वेळपर्यंत मी त्याच्या खुर्चीमागें उभा राहून तो 'देखावा' शातपणें अवलोकन केला.

अखेरीस या 'चमत्कारा'चा उलगडा करून घ्यावयाचाच असे मीं मनाशी ठरविलें. माझी खात्री होती, की रंगराव आपल्या हार्दिक गोष्टी जर कोणाजवळ मनमोकळेपणाने बोलेल तर तें माझ्याजवळच. त्याचें बाह्य वर्तन कितीहि निंद्य असलें तरी तो अन्तःकरणाचा मोठा उमदा माणूस होता व म्हणूनच विपरीत परिस्थितीच्या तुफानातहि आमच्या मैत्रीचें तारूं टिकून राहिलें होतें.

त्या समाधीतून रंगरावाला जागा कसा करावा, याचा मला पळभर

विचार पडला. मी पुढें झालों व रंगरावाच्या हातातून वहिनीचा फोटो काढून घेतला. तळयाच्या पाळीवर बसलेल्या माणसाला मागून कुणी एकदम तळयात ढकलून दिलें म्हणजे त्याला जसें हात मारण्याचेंहि क्षणभर भान राहत नाही, त्याप्रमाणें रंगरावाची काही वेळ किंकर्तव्यमूढ स्थिति झाली. दचकल्यासारखी मान हलवीत 'काय—कोण?' इतकेच शब्द अस्पष्टपणे त्याच्या तोंडून बाहेर पडले. पण थोड्याच वेळात झालेली घटना त्याच्या ध्यानात आली असावी. फुंकर मारून लाल झालेल्या निखाऱ्याप्रमाणें त्याचा चेहरा रागानें तप्त झाला. डोळयात कट्यारीचे तीक्ष्ण पाणी चमकूं लागलें. तो काही तरी बोलण्या-साठी धडपडत होता, पण तोंडातून शब्द निघत नव्हता. थंडीनें पाणी गोठावें तशी रागाने त्याची वाचा बंद झाली होती. बाटलीला बूच घट्ट बसले म्हणजे जसा आतील प्रवाही पदार्थ बाहेर येऊं शकत नाही, तसे रागामुळे त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडेनात!

मी त्याची स्थिति ओळखली. त्याला समाधीतून जागें करण्याचे माझें काम झालेच होतें. तेव्हा मी वहिनीचा फोटो त्याच्या हाती परत दिला. एखाद्या कृपणाची हरवलेली ठेव सापडावी तसें फोटो परत मिळताच रंगरावाला झालें. त्यानें आवेगानें त्या फोटोचे चुंबन घेतले, तो हृदया-शीं घट्ट आवळला व मेजाचा डावा खण उघडून त्यात तो ठेवला व घाईघाईनें खण बंद केला. जणू काय मी म्हणजे बेडकाच्या मागे लागलेला कृष्णसर्पच, असे त्यास वाटलें असावे. त्याची ही बालिश धडपड पाहून त्या स्थितींतहि मला किंचित् हसू आल्यावाचून राहिलें नाही.

मी रंगरावच्या आणखीहि जवळ गेलो. अत्यंत प्रेमभरानें त्याच्या खांद्यावर हात ठेवून तो जरासा दाबलासा करून हलविला, आणि स्वर शक्य तितका आर्जवी करून मी त्याला म्हणालों—

" रंगराव, माझ्यावर तूं रागावलास ? "

पाण्याच्या एकाच फवाऱ्याने लागलेली आग विझावी त्याप्रमाणें माझ्या प्रश्नाने रंगरावाचा सारा राग निमिषार्धात निमाला. त्याने माझा हात आपल्या दोन्ही हातात धरून गदगदा हलवून जोरानें दाबला व म्हटले---

" नाही—मुळीच नाही. तुझ्यावर रागावण मला शक्य नाही."

" मग तुझा चेहरा संतापान लाल का झाला ? माझ्याकडे आपल्या नेत्रातून तूं असं तीव्र शरसंधान का केलस ? " मी विचारलें.

" मला आत्ता एक गोड समाधि लागली होती." रंगराव एखाद्या बालकाच्या मोकळेपणानें बोलूं लागला, " तीतून मला एकाएकी कुणी तरी धक्का देऊन जाग केल म्हणून मला प्रथम राग आला हें खर; पण तुला पाहताच, आईला पाहून मूल रड विसरतं तसा, माझा राग नाहींसा झाला... पण बैस ना तूं. उभा कां ? अन् इतक्या रात्रीचा आलास ? "

मी जवळच्या दुसऱ्या एका खुर्चीवर बसलो व म्हणालों, " आज लॅरा ला प्लॅटीचा 'शो बोट' चित्रपट लागला आहे तो पाहायला जावं तुला घेऊन, म्हणून आलों होतो...."

" मग जाऊं या आता ? चल." मनगटावरील घड्याळाकडे पाहत तो म्हणाला, " हे पाहा दहा वाजलेत. शो सव्वा दहाला सुरू आहे ना ? "

असें म्हणून रंगराव खुर्चीवरून उठलासुद्धा. मघाचा विषय बदलण्यासाठीच त्याची ही कृत्रिम धडपड चाललेली आहे हें मी लागलीच ओळखलें व इतक्या जलद त्यानें आपले अनावर झालेले विकार दाबले हें पाहून तर मला फारच आश्चर्य वाटलें. मीं त्याचा हात धरून त्याला परत खाली बसविलें व म्हटलें—

" नाही! आता सिनेमाला जायचं नाही."

" तर?" त्याने किंचित् विस्मयानें विचारलें.

थोडा वेळ मी काहीच बोललों नाही. विषयाला हात कसा घालावा याची मी मनात योजना करीत होतो. नंतर मी सुरुवात केली—

" रंगराव, तुझा जीवश्चकंठश्च मित्र या नात्यान मी तुला कांहीं विचारलं, तर अगदी संकोच न धरतां सगळं सांगशील मला?"

" इतकी जरतारी भाषा बोलण्यासारखं तूं मला काय विचारणार आहेस?"

त्यानें चेहऱ्यावर हसें आणण्याचा यत्न केला. पण विधवेनें पेहेरलेल्या अलंकाराप्रमाणेच ते हसे त्याच्या चेहेऱ्याला विशोभित दिसत होतें. मी काय विचारणार आहें हें तो पूर्ण समजून चुकला असावा; पण वरकरणी तो अज्ञानाचे पांघरूण घेत आहे असे मला वाटलें. मी म्हणालों—

" आत्ताच्या या प्रकाराचा खुलासा" मी एकदम प्रस्तुताकडेच वळलों.

रंगराव गप्पच बसला. तो मनात काही तरी विचार करीत असावा असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसलें. काही वेळ थांबून मीं पुन्हा विचारलें—

" का? विचार कसला करतोस इतका? माझी मागणी इतकी का अवजड वाटते तुला?"

मी मुद्दामच त्याच्याकडे रोखून पाहिलें. त्याच्या डोळ्यात अश्रु साठलेले मला दिसले. त्यानें एकदम माझा हात धरून म्हटलें—

" आता हा ताप माझ्यानं सोसवत नाही. कुणाजवळ तरी माझं

अन्तःकरण उघडं करावं असं मला सारख वाटतं आहे. विश्वासानं हृदय उघड करण्याला तुझ्याइतका लायक स्नेही मला दुसरा नाही."

आणि पुष्कळ दिवस सुषुप्तेंत असलेल्या ज्वालामुखीचा एकदम स्फोट व्हावा व त्यांतून लाव्हारसाचा वर्षाव सुरू व्हावा, त्याप्रमाणें कैक दिवस दाबून ठेवलेल्या मनोभावनाचा एकाएकी उद्रेक झाल्यामुळें रंगरावाच्या तोंडून भराभर मागील इतिहास बाहेर पडूं लागला.

"मंदाकिनीची व माझी ओळख झाली ती टेनिसकोर्टावर. माझा वर्गबंधु मनोहर साखरपाडे याच्याबरोबर ती त्या दिवशी कोर्टावर आली होती. कोर्टावर संध्याकाळी गर्दी फार होत असल्यामुळ मनसोक्त खेळायला मिळत नसे म्हणून आम्ही सकाळी खेळायला जात असू. सूर्य-नारायण क्षितिजाच्या टेनिसकोर्टावर व आम्ही उभयता क्लबच्या टेनिस-कोर्टावर एकदमच पाऊल टाकीत असूं. रोजच्याप्रमाणं त्या दिवशीहि मी कोर्टावर वेळेवर हजर झालों. पण या सूर्यनारायणाचा अरुण जो मनोहर तो काही उगवलेला दिसेना. तसं पाहिल तर टेनिस, सिनेमा, चहा, फीस्ट अशा बाबतीत वक्तशीर एंगेजमेंट पाळण्यात मनोहर म्हणजे प्रति मडलीकच दुसरा ! मग आज तो का आला नाही, अशा विचारांत मी त्याची प्रतीक्षा करीत राहिलों. केशराचा वास लांबूनच यावा, त्याप्रमाणें थोड्याच वेळान मनोहरचा आवाज मला ऐकूं आला. तो मोठ्यानं हसतखिदळत व बोलत येत होता. उशीर केल्याबद्दल त्याची झडती घेण्यासाठी हातात रॅकेट फिरवीत मी चार पावलं पुढं गेलों. पण नेहमींप्रमाणं आज तो एकटा नव्हता. त्याच्याबरोबर आज कुणी तरी युवती येताना दिसत होती. जणूं अरुणाबरोबर

उषेचाहि उदय झाला होता! तिला पाहताच मनोहरची झडती घेण्याचा माझा विचार पाण्यावरच्या बुडबुड्याप्रमाणं जागच्याजागीं जिरला.

वीज चमकल्यावर आपली दृष्टि कांही काळ स्तिमित व्हावी तसं मला झालं. माझी नजर एकसारखी तिच्यावर खिळून राहिली. तिचं तें नीळसर पातळ व गुलाबी ब्लाऊज किती शोभिवंत दिसत होता! तिचा वर्ण निमगोरा होता, पण चेहऱ्यावरील कातीमुळं तिच्याकडे कोणाचंहि मन आकर्षिल जाई. तिचा बांधा भरीव व मोहक होता. डोळयांतील काळीभोर बुबुळं एकसारखी संचार करीत होती. तें पाहून स्वच्छ जलाशयांत सुंदर मीनच क्रीडा करीत आहेत असा भास होई!

मी त्या युवतीचं निरीक्षण करीत आहें, इतक्यांत मनोहर क्लबच्या आवारात आला सुद्धा. तेव्हा अर्थात्च तिच्यावरून दृष्टि फिरवून मला मनोहरकडे वळाव लागल.

'शाबास मनोहर!' मी त्याला उद्देशून हसत हसत म्हणालों, 'किती उशीर केलास हा आज?'

'अरे बाबा, मी निघालों होतों वेळेवर, पण आमच्या या ताई-साहेबानी केला उशीर.' तिच्याकडे मिस्कील दृष्टिक्षेप करीत मनोहर कुचेष्टेच्या स्वराने म्हणाला, 'स्त्रियाच्या गजगतीचं वर्णन मी काव्यांतून खूप वेळा वाचल आहे. पण आमच्या मंदेनं आज त्याचा मला वस्तुपाठच दिला म्हणेनास. का मंदे, असच ना?'

मंदेनें कृत्रिम कोपाने मानेला असा कांही हिसडा दिला, की 'चल फाजील कुठला' हा तिच्या मनातील भाव त्यात स्पष्ट व्यक्त झाला.

मनोहर म्हराड्याच्या पायऱ्या चढून वर आला. त्याच्या मागून मंदाकिनीहि आली. मी चोरून दोन-तीन वेळ तिच्याकडे दृष्टिक्षेप करण्याचा प्रयत्न केला. पण प्रत्येक वेळीं तिच्या दृष्टीला दृष्टि भिडल्या-मुळें मला ताबडतोब दुसरीकडे नजर वळवावी लागली.

मनोहर आला तो कोट-टोपी न काढताच एका खुर्चीवर बसला, तें पाहून मी म्हणाले—

'का रे खेळायचं नाही का आज!'

'भले! मग एवढ्या 'पहाटे' गुलाबी झोपेतून उठून इथवर तंगड्या तोडीत आले ते कशाला? पण रगराव, आज आपल्या नेहमीच्या कार्यक्रमात थोडासा चेंज करावयाचा आहे पाहा.' नतर खट्याळपणें मदाकिनीकडे पाहत मनोहर हसत हसत पुढें बोलू लागला, 'आज ही आमची मंदा खेळेल प्रथम तुझ्याबरोबर. ती म्हणे यंदा तिच्या शाळेच्या सामन्यांत चॅंपियन आली आहे. अन् तूं आहेस आमच्या कॉलेजचा हीरो. तेव्हा होऊं दे तुमचा दोघाचा सामना. थोडी गमत तर पाहूं!'

मनोहरच्या या भाषणाने मदाकिनीकडे मी पाहिलें. तिनेंहि त्याच वेळी मजकडे दृष्टिक्षेप केला. पुन्हा नजरानजरेची भेट! ती लाजली. पण किती मोहक!

आम्हां दोघापैकीं कोणीच कांही बोलत नाही असें पाहून मनोहरच म्हणाला—

'हो बाबा, चुकलों खरा मी. तुमची इन्ट्रोडक्शन् करून द्यायची विसरलोंच मी. म्हणूनच तुमच्या तोंडाला अशी खीळ पडलेली दिसते. नाहीं तर इतका वेळ ताईसाहेब कुठल्या गप्प बसायला! एक वेळ बोरीबंदरवर आगगाड्यांचा खडखडाट

ऐकूं येणार नाही, पण आमच्या ताईचा किन्नरी स्वर ऐकूं येणार नाहीं, अशी पाच मिनिटं जायची नाहींत.'

'इश्श, आज जीभ फारशी सैल सुटलेली दिसते. तूं असा वात्रट-पणा करणार हें ठाऊक असतं तर मी तुझ्याबरोबर आलेंच नसतें.'

मंदाकिनीनें रागाचा आव आणून गाल फुगविले. पण पातळ आच्छादनातून लपविलेला जिन्नस स्पष्टपणे दिसावा तसा तिच्या या कृत्रिम रागामागचा मोहक अनुराग त्यातून छटा न् छटा दिसत होता.

'बरं बुवा, क्षमस्व म्हणतो, त्वमेव शरणम् देवि.' असें म्हणून मनोहरनें तिच्याजवळ जाऊन हात जोडले, 'आता तरी गेला ना सारा राग?'

मंदाकिनीच्या दाबल्या ओठांतून खुदकन् हसं बाहेर निसटलंच. एखादी निर्झरिणी निनादावी त्याप्रमाणं तिच्या हास्याचा मंजुळ कलरव ऐकूं आला.

'अरे रंगराव' माझ्याकडे वळून मनोहर म्हणाला, 'आमचे चुलत-चुलते मुंबईला डॉक्टर आहेत ना? त्याची ही कन्या मंदाकिनी, लक्षांत ठेव हं. अन् मंदे, हा आमचा क्लास फ्रेंड रंगराव कुलकर्णी, चांगला स्पोर्ट्स्मन् आहे. तुझी टेनिस खेळण्याची सगळी हौस हा पुरवील.'

नंतर रीतसर आमचं उभयताचं बोलणं सुरू झाल. मनोहरनं फारच आग्रह केला, तेव्हा मंदाकिनी माझ्याशी एक सेट खेळण्यास कबूल झाली. टेनिस खेळण्यात तिचं चागलंच प्रावीण्य दिसून आलं. आलेला बॉल रिटर्न करण्यासाठी कोर्टावर इकडून तिकडे पळणारी मंदाकिनी हिरवळीतून नागमोडी वाहणाऱ्या निर्झरिणी-प्रमाणं भासे. खेळताना तिची दृष्टि एकसारखी माझ्याकडेच लागून

राहिलेली दिसे व त्यामुळं तिचा खेळ बरेच वेळा हुके. माझीहि स्थिति थोडीफार तशीच झाली होती. एकीकडे खेळण्याकडे अवधान ठेवून मंदाकिनीच्या रम्य धावपळीकडे व तद्भव अंगप्रत्यंगाच्या मोहक हाल चालीकडे लक्ष द्यायचं म्हणजे तोल सभाळून दोरावर चढत जाण्या-सारखच कसरतीच काम होतं. आमची दोघाची अशी अवस्था पाहून खट्याळ मनोहर मनापासून हसे व असा काही तरी कोटीबाज विनोद करी, की त्याच आम्हास सुद्धा हसू येई!

एक सेट खेळून झाल्यावर आमचा खेळ सपला. मी खेळातील तिच्या प्रावीण्याबद्दल मंदाकिनीची खूपच तारीफ केली. आणि जरी वरकरणी ती विनयाचा आव आणीत होती, तरी मी केलेल्या तिच्या स्तुतीनें तिला मनात आनद झालेला तिचे गाल मला स्पष्ट दाखवीत होते.

आम्ही परत निघालो तेव्हा मनोहर मंदाकिनीला उद्देशून म्हणाला—

'का मंदे, लव्ह सेट घेतलास ना रंगरावाकडून! आहे ऽऽ बुब्बा रंगराव.' "

"दुसरे दिवसापासून मंदाकिनी रोजच खेळायला येऊ लागली व त्या-मुळं तिचा व माझा परिचय वाढत गेला व त्याचं मैत्रीत रूपातर झालं. मनोहरन म्हटल्याप्रमाण मंदाकिनीला खूपच बोलायला हव होत. त्यामुळं आमची गट्टी जमण्याला फारसा वेळ लागला नाही. तिच्या किन्नरी आवाजाच व बोलताना होणाऱ्या चेहऱ्यावरील भावविभावांच मला फार कौतुक वाटे. तिचं मन हळवं व हृदय प्रेमळ होत. दिवसे-दिवस फुलाची एकेक पाकळी उमलावी व आतील सौरभ अधिकाधिक

दरवळून जावा, त्याप्रमाणे वाढत्या परिचयानं मदाकिनीच्या अगचा एकेक गुण मला दिसूं लागला व मला नकळतच माझं तिच्यावर प्रेम जडलं. काही दिवसानी ती परत गेली, तेव्हा तिन माझ्या हृदयात पेटवलेली प्रेमज्योत मला करून आली. घारीनं लोण्याचा गोळा पळवावा तस मदाकिनीन जाताना माझं मन चोरून नेल होतं. भोंवऱ्यात सापडलेली नौका जशी स्वतःभोंवती गरगर फिरत राहते तस प्रेमाच्या झपाट्यात सापडलेल माझ मन मदाकिनीभोवती घिरट्या घालीत होत.

आणि मंदाकिनी गेली तशी माझी शुद्धहि गेल्यासारखंच झालं. भ्रमिष्टाप्रमाण माझं वर्तन होऊं लागलं! मला काही सुचेना, काही रुचेना असं झाल! वारा वाहील तिकडे भटकणाऱ्या शीड नसलेल्या तारवाप्रमाण माझी अवस्था झाली. माझी ही हृदयव्यथा असह्य झाली, तेव्हा मी मनोहरास सर्व गोष्टी स्पष्ट सागितल्या व त्याच्या साहाय्याची याचना केली. मनोहरानं तावडतोब डॉक्टरसाहेब व मदाकिनी याची या सबंधाला पूर्ण सम्मति असल्याचं मला हसत हसत सागितल. इतकच नव्हे तर, याच हेतून मदाकिनीचा व माझा परिचय आपण मुद्दाम करून दिला असं जेव्हा त्यान सागितलं तेव्हा मात्र त्याच्या पाताळयंत्रीपणाची मला धन्यताच वाटली. पण त्याच्या आश्वासनानं मला जो आनद झाला, त्याचं वर्णन करण शक्य नाही.

त्या दिवशी मोठ्या आनंदान मी संध्याकाळच्या सुमारास मनोहरकडून परत घरी आलों. कपडे वगैरे काढून, मदाकिनीनं जाता वेळेस मला भेट म्हणून दिलेला तिचा हा फोटो [ येथे रंगरावने मेजाचा खण उघडून मघाचा तो फोटो बाहेर काढून हातात घेतला व त्याकडे टक लावून त्यानें आपलें भाषण पुढें चालू केलें ] घेऊन मी त्याकडे पाहत बसलों होतो, इतक्यात आई वर आली व मला म्हणाली—

'रंगराव, जरा खालीं येतोस का? तुझ्याकरतां मी काय गम्मत आणली आहे पाहा तरी.'

मी आईच्या तोंडाकडे पाहिलं. ती मिस्किलपणें हसत होती. मी विचारलं—

'अशी काय बुवा गम्मत आज आणली आहेस तूं माझ्यासाठी?'

'खाली येऊन बघ तर खरा, मग म्हणशील...'

'कांहीं नाही म्हणणार. सांगेनास का तूंच.'

मानेला एक हिसडा देत आई म्हणाली, 'मी नाही कांही सांगत जा. तूं खाली चल आधीं अन् पाहा प्रत्यक्षच काय तें.'

मी उठलों. फोटो कपाटात ठेवला व खालीं जाण्यास निघालों. इतक्यांत आई म्हणाली—

'अरे, हें काय रंगराव, असाच का येणार तूं? छे बाबा, सदरा तरी भट्टीचा घाल. तोंडावरून पाणी फिरव अन् मग चल.'

आईच्या या बोलण्याचा उद्देश माझ्या लक्षात येईना, पण अधिक कांही विचार न करता मी तिनें सांगितलं तसं करून खाली गेलो.

खाली माजघरात एक जाजम अंथरलें असून त्यावर एक पोक्त वयाची स्थूलशी बाई बसली असून तिच्याजवळ एक तरुणी खाली मान घालून बसलेली मला दिसली. स्विच् दाबताच लख्ख उजेड पडावा तसा त्या बायकाना पाहताच आईसाहेबाचा कावा माझ्या लक्षात आला.

आईनें दिलेल्या पाटावर मी बसलों. आई म्हणाली—

'ही पाहिलीस का मुलगी, रंगराव! तुला सांगून आली आहे. तिला कांहीं विचारायचं-सवरायचं असलं तर घे विचारून. मग मागाहून म्हणशील मला आधीं का दाखविली नाही म्हणून.'

'तूंच विचार काय तें' मी किंचित् गोंधळून जाऊन म्हणालों. हा असला प्रसंग मजवर पहिलाच होता. त्यामुळं काय बोलावं हें मला सुचेना.

'अरे असा लाजतोस काय?' आई कौतुकानं हसत बोलली, 'तुम्ही शिकलेली मुलं बायकापेक्षाहि लाजता! तुला जन्म काढावा लागणार तिच्याबरोबर अन् मी रे काय विचारणार तिला?'

इतक्या वेळात त्या 'वधू'चं बहिरंगपरीक्षण मीं केलंच होतं. ती रूपानं चांगल्यापैकी होती हें तर तिचा चेहरा सांगत होता. पण तिच्या सौंदर्यांत एक प्रकारचा उग्र दर्प आहे असं मला वाटलं. मंदाकिनीपेक्षा ही निःसंशय रूपसुंदर होती. पण तिची माधुरी कांहीं हिच्या ठिकाणीं नाहीं असं मला वाटलं.

'तें आपलं तुझं तूं पाहून घे. मला काहीच विचारायचं नाहीं.' अस म्हणून मी तेथून झटक्यानं उठून माडीवर आलों व फिरून मंदाकिनीचा फोटो काढून पाहूं लागलों. आताच्या तरुणीची या फोटोंतील मंदाकिनीशीं तुलना करण्याचा मोह मला आवरेना. व या तुलनेच्या अखेरीस माझं मन मंदाकिनीकडे अधिकच आकर्षलं गेलं!

दुसरे दिवशी जेव्हा आईनं पुन्हा त्या मुलीसंबंधीं मला विचारलं तेव्हा मीं स्पष्टपणें नकार दिला. त्यामुळं आईला वाईट वाटलं. कारण कालची ती स्थूल बाई– त्या मुलीची आई–तिची लहानपणापासूनची मैत्रीण होती व या मैत्रीच्या मण्याला नात्याच्या कोंदणात बसवण्याची त्या दोघींचीहि उत्कट इच्छा होती. आई तर तसं स्पष्ट आश्वासनहि देऊन चुकली आहे असं तिनं मला सांगितलं. त्यामुळं माझ्या नकारानं तिचा चांगलाच जळफळाट झाला. पण माझाहि त्याला इलाज नव्हता. कारण बाण धनुष्यावरून केव्हाच सुटलेला होता!

माझ्या या नकारानं घरात वादळ निर्माण झालं. आईन खूप त्रागा कला, पण माझं म्हणणं ऐकून घेतल्यावर बाबानी माझीच बाजू उचलून धरली. त्यामुळं तिचं कांही चालं शकलं नाही. पण या बाबतीत आपला अपमान झाला, अशी आईनं आपली समजूत करून घेतली, आणि आपल्या या फजितीला ही कौटाळीण कारणीभूत झाली या समजुतीनं आईच्या मनात मंदाकिनीविषयी तीव्र तिरस्कार उत्पन्न झाला व तो अखेरपर्यंत कांही नाहीसा झाला नाही.

वर्षाऋतूनंतर भूमि गवतून जावी, तसं माझं मन मंदाकिनीच्या प्राप्तीन आनंदून गेलं. तिच्या प्रिय सहवासात दिवस किती जलद् गेले तें कळलंहि नाही. "जगीं सर्व सूखी असा कोण आहे?" असा प्रश्न मला त्या वेळी कोणी विचारला असता, तर मीं स्वतःच्या छातीवर अभिमानानं हात ठेवला असता. मंदेच्या प्रेमळपणानं मला कायमचं बाधून टाकलं होतं, तिच्या काव्यात्म वृत्तीने मला वेड लावलं होतं, अस म्हटल तरी चालेल. आमच्यासाठीं फुलाचा बगीचा परमेश्वरानं सदैव फुललेला ठेवला आहे असं आम्हास वाटे.

पण मजबूत म्हणून समजली जाणारी इमारतहि पावसाच्या एकाच माऱ्यानं ध्यानी-मनी नसता जमीनदोस्त व्हावी, त्याप्रमाणं अवघ्या सहा महिन्यातच आमची ही समजूत एकाच प्रसंगामुळ ढासळून धुळीस मिळाली. चंदनाच्याभोंवती नेहमीच सर्पाचा विळखा असतो हें कटु सत्य मात्र पुर अनुभवास आल. माझ्या लग्नानंतर सहा महिन्यानीं, चार दिवस ताप आल्याचें निमित्त होऊन बाबा वारले, व त्याच्या मृत्यूबरोबरच माझ्या सुखाचाहि अंत झाला आणि माझ्या आयुष्याच्या कादंबरीच्या शोकपर्यवसायी भागास जन्म मिळाला.

आईच्या इच्छेविरुद्ध मी मंदाकिनीशी लग्न केल्यामुळं ती मंदाकिनीला बरे पाहीनाशी झाली. बाबाच्या मृत्यूचं खापर तिनें मंदाकिनीच्या माथ्यावरच फोडल. याच पांढऱ्या पायाच्या बयेच्या पायात आपलं सौभाग्य हरपलं असा तिनं ग्रह करून घेतला. शेजार-पाजारच्या चार म्हाताऱ्या 'सनातनी' बायकानी आईला या तिच्या समजुतीबाबत दुजोरा दिला. त्यामुळं साठलेल्या पाण्याला पुराच पाणी मिळावं तसं झाल व त्या पाण्यात मंदाकिनीच्या सुखाची हिरवळ पार वाहून गेली !

प्रथम प्रथम आई आपला राग केवळ जिभेचा पट्टा चालवूनच उगवून घेई. घालूनपाडून बोलण्यात बायकाची बुद्धि तरवारीच्या धारे-प्रमाणं तीक्ष्ण असते. आईवर कोसळलेला प्रसंग लक्षात घेऊन मदा-किनी तिच्या या उण्यादुण्याकडे कानाडोळा करीत असे. पण जो जों ती हे सहन करूं लागली, तों तो तिच्या नशिबी छळाचे नवे नवे भोग येऊं लागले, आणि त्यामुळं वणव्यात सापडलेल्या हरिणीप्रमाणं या आगीत मंदाकिनी भाजून निघूं लागली. पण तिनंहून या गोष्टी माझ्यापर्यंत कधीच आणल्या नाहीत. नाही तर मी वेळींच त्याचा काही तरी बंदोबस्त केला असता. पण या गोष्टी मला समजल्या, तेव्हां त्या माझ्या कल्पनेची शीव ओलांडून पुढ गेल्या होत्या. मंदाकिनीनं बोलून दाखवलं नाही, तरी तिला त्रास व्हावयाचा तो झालाच व त्याचा परिणामहि हळूहळू तिच्या शरीरप्रकृतीवर दिसून येऊं लागला. मी तिला या प्रकाराच कारण वरचेवर विचारी, पण ती काही तरी उडवाउडवीची उत्तरं देई. जखम झाली असता वारा घालून जरी कांही काळ वेदनाची तीव्रता कमी करता आली, तरी जखम भरून येत नाही त्याप्रमाणं, या उडवाउडवीच्या उत्तरानी माझं तोंड तात्पुरतं

बंद झालं, तरी कायमच समाधान होईना. या प्रकाराच्या बुडाशी जाणं मला जरूर वाटूं लागलं.

त्यानंतर मी आठ दिवसांच्या मुदतीनं कांहीं कामासाठी परगांवीं गेलो होतो. पण माझं नियोजित काम मुदतीपूर्वीच संपल्यामुळं मी आधींच परत आलो. घरात त्या दिवशीं मी येणार हें कोणासहि ठाऊक नव्हतं. रात्री नऊ-साडेनऊच्या सुमारास मी अचानक घरी येऊन थडकलों. मला पाहताच आई जरा चपापलीशी मला वाटल. आईबरोबर औपचारिक बोलून मी जेवण वगैरे उरकलं. पण इतका वेळ मंदाकिनी कुठं दिसलीहि नाही. कदाचित् ती झोपली असावी या समजुतीन मी चौकशी केली नाहीं. जेवल्यानंतर मी हलकेंच शय्या-गृहाचं दार उघडून पाहिलें, तों मंदाकिनी स्फुदूनस्फुंदून रडत असलेली मला दिसली. डाव्या माडीवर उजवी माडी टाकलेली अशी ती खालीं जमिनीवरच बसली होती. पलगावर हातावर हात टाकून त्यावर कपाळ ठेवून ती रडत होती.

आपण प्रेमानं लावलेली व जोपासलेली लता अनपेक्षितपणे छिन्न-विच्छिन्न झालेली दिसावी तसं मला झालं. मी लागलीच पुढं होऊन तिच्या दोन्ही खांद्यावर हळुवारपणं हात ठेवून हाक मारली—

'मंदा, मंदाकिनी—'

तिनं चमकून वर पाहिलं. मी दृष्टीला पडताच झटकन् पदरानं डोळे पुसून ती उठली व हसण्याचा विफल यत्न करीत म्हणाली—

'अगबाई ! केव्हा येणं झाल ? मला कळलच नाही आपण आल्याचं. काय भेली झोप तरी !'

'मंदा, आतां हें सोंग पुरें झालं.' मीं जरा हुकमी आवाजांत

म्हटलं, 'अन् तूं कां रडत होतीस तें अगदी खरं खरं सांग. त्याशिवाय आज तुझी सुटका नाहीं.'

प्रथम तिनं बरेच आढेवेढे घेतले—पण अखेर तिला सारं कांहीं सांगावंच लागलं. काठोकाठ पाणी भरल्यावर तें सांडल्याखेरीज कसं राहणार? आईनं केलेल्या छळाची हकीकत मंदाकिनीनं मला सांगितली. व रागाच्या भरात तिनं आज आपल्यावर हातहि टाकला, त्यामुळंच आपण आज रडत होतो वगैरे वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून मला विलक्षण संताप चढला व त्या भरात मंदाकिनी परोपरीनं नको नको म्हणत असतां, तें न ऐकतां, त्या रात्रीं मी आईला बरंच बोललों व असल्या गोष्टींची पुनरावृत्ति इतःपर होतां कामा नये असं बजावलं.

पण माझ्या या कृत्याचा परिणाम अगदींच उलट झाला. मंदाकिनीनंच माझे कान भरले व आपला असा अपमान माझ्याकडून करवला अशी आईची समजूत होऊन तिचा पूर्वीचा द्वेषाग्नि चांगलाच चेतवला गेला, व त्यामुळं ती हट्टानं मंदाकिनीचा पूर्वीपेक्षां अधिक छळ करूं लागली. मंदाकिनी आपण होऊन शक्यतों माझ्यापर्यंत या गोष्टी आणीत नसे. पण घरांत प्रत्यहीं उठणाऱ्या भांडणांच्या ज्वालांची झळ मला लागल्याखेरीज कशी राहील? मी जेव्हां जेव्हां आईस याबाबत बोलत असें, तेव्हां तेव्हां मी बायकोचा पक्ष घेऊन मला म्हातारीला छळत आहे असा ती कांगावा करी. त्यामुळं माझ्या बोलण्यानं आगींत तेल ओतल्यासारखंच होत जाऊन भडका अधिकाधिकच होत गेला.

ही आग कशी शमवावी हें मला कळेना. या आगींत मंदाकिनी दिवसेंदिवस अधिकाधिक होरपळून निघत होती, तेंहि मला पाहवेना.

आईनं तर आता चंडिकावतारच धारण केल्यासारखं केलं होतं. तिच्या हातांत होते त्या सर्व प्रकारांनी ती मंदाकिनीला छळण्यास कमी करीत नसे. त्यामुळं प्रत्यही तिची प्रकृति खंगत चालली. त्यातच तिचे दिवस भरत आले होते.

अखेर मी ठरविलं, की बाळंतपणाच्या निमित्तानं मंदाकिनीला माहेरी पाठवून द्यावी व चार-सहा महिने आणूंच नये तिला. तोंपर्यंत आईच्या मनोवृत्तीत कांहीं फरक पडला तर पाहावा. या गृहछिद्रात माझी परिस्थिति अत्यंत नाजूक झाली होती. एकीकडे प्रिय पत्नी व एकीकडे पूज्य माता ! या दुहेरी पेचात सापडल्यामळं काटा आणि सुरी याच्या तडाख्यात सापडलेल्या पावासारखी माझी शोचनीय स्थिति झाली होती. मदाकिनीच्या सोशिकपणाची मात्र मला राहून राहून धन्यता वाटे. तिच्या या वृत्तीमुळंच केवळ आमच्या घरातील वादळाचे लेट गावभर पसरले नाहीत ! पण हाच सोशिकपणाचा भुंगा तिचं शरीर एकसारखं पोखरून काढीत होता, हे तिच्या लक्षात आलं नाहीं.

या प्रकारामुळ संसाराला विटलेल माझे मन मंदाकिनी माहेरी गेल्या-वर घराला पुरतच विटून गेल. मला घरात पाय घालवासा-सुद्धा वाटेनास झाल. पाश नसलेल्या सन्याशाप्रमाणं माझी स्थिति झाली. मंदाकिनीचं कसं काय निभतं एवढीच एक विवंचना मला होती. तीहि दैवानं लौकरच नाहींशी केली. आईच्या छळानं हलक झालेली मंदाकिनीची लता बाळंतपणाच्या धक्कयानं जमीनदोस्त झाली ! ढग नाहींसे झाल्यावर इंद्रधनुष्याची शोभा राहत नाहीं, त्याप्रमाणं मंदाकिनी गेल्यावर माझ्या संसारातील सारा राम नाहीसा झाला ! ”

रंगराव थोडा वेळ थांबला. मी त्याच्या चेहऱ्यावरची नजर ढळूं दिली नाही. काही वेळानं रंगरावानंच आपली कहाणी पुढ चालू केली:

" मंदाकिनीच्या मृत्यूनं माझ्या मनाची काय अवस्था झाली असेल याची तूंच कल्पना कर. पण माझं दुर्दैव येवढ्यावरच थांबलं नाही. केवळ दारिद्र्य येऊनच चारुदत्ताचं दुर्दैव थांबल नाही, तर त्याच्या जोडीला चोरी व खून केल्याचा आरोपहि त्याचेवर आला, तेव्हा जसा त्याच्या काळजानं ठाव सोडला, त्याप्रमाणं माझहि झाल. मंदाकिनीच्या अशा प्रकार घडून आलेल्या मृत्यूनं माझ्या हृदयाला झालेल्या जखमेंत आमच्या आईसाहेबानी व इतर आतेष्टानी जेव्हा दुसऱ्या लग्नाचं मीठ चोळण्याचा एकसारखा सपाटा सुरू केला, तेव्हा तो दाह सहन करण्याची शक्ति मज पामरामधें उरली नाही. प्रथमतः मी सौम्य शब्दात या बोलण्याचा निषेध करून पाहिला. पण तो प्रकार कमी तर झालाच नाही; पण आजवर केवळ दुसऱ्या लग्नाच्या गोष्टीच निघत, त्याऐवजी आता मुलीहि सागून येण्यापर्यंत मजल गेली. इतकंच काय, पण एके दिवशी आईनं पुन्हा त्या दिवशीची ती मुलगी मला दाखवण्यासाठी घरी आणली. त्या दिवशी मात्र माझा मनावरचा ताबा नाहींसा झाला. खुंटी जास्त पिळल्यानं सतारीची तार तटकन् तुटावी त्याप्रमाणं त्या प्रसंगानं माझा विवेक पार नाहीसा झाला, आणि आईनं व इतरानी माडलेली माझ्या एकनिष्ठ प्रेमाची ही विटंबना चुकावी म्हणून मी एकदम वाम मार्ग आपखुषीनं जाणूनबुजून पत्करला. माझ्या या बाहेरच्या नादाचा गवगवा होताच या ढोंगी समाजातील लब्ध प्रतिष्ठिताच्या दृष्टीनं मी पतित गणला जाऊं लागलों खरा; पण त्यामुळं माझ्या दुसऱ्या लग्नाचा प्रश्न निकालात निघाला. शरिराच्या अपवित्रपणाच्या मोबदल्यानं मी माझं मनःस्वास्थ्य विकत घेतल ! मंदाकिनीवरील

माझ्या प्रेमाचं गुलाब पुष्प पहिल्या भेटीइतकंच आजहि माझ्या हृदयोद्यानांत ताजं टवटवीत आहे. ही पाहा तिची प्रतिमा. तिचं दर्शन घेतल्याखेरीज मी अन्नग्रहण करीत नाहीं."

असं म्हणून रंगरावानं पुन्हा मेजाचा खण उघडला व त्यातून मंदाकिनी--वहिनींचा तो फोटो बाहेर काढला. एका रेशमी वस्त्रांत गुंडाळून ठेविलेली तिची कांही पत्रेंहि त्यानें मला दाखविलीं. त्या पत्रावर कांही सुकलेल्या फुलाच्या पाकळ्या दिसत होत्या !

मी तो फोटो हातात घेऊन पाहूं लागलों. फोटोच्याखालीं रंगरावानें स्वहस्तें लिहिलें होतें—

" मृत्युदिन ता. ११ जुलै "

मीं सहजच भिंतीवर टांगलेल्या कॅलेंडरकडे दृष्टि फेकली. तों काय आश्चर्य ! आजहि तीच तारीख होती. मी रंगरावकडे पाहून विचारलें—

" आज वहिनीचा श्राद्ध-दिन आहे एकूण ? "

रंगरावानें नुसतांच हुंकार दिला व माझ्या हातातून वहिनींचा फोटो आपल्या हातीं घेतला. फोटोवरील मृत्युदिनाच्या तारखेकडे दृष्टि जाताच त्याच्या डोळ्यातून पुन्हा अश्रुप्रवाह सुरू झाला !

# शशि-लांच्छन

वाघाच्या आरोळीनें भेदरून पळणाऱ्या हरिणशिशूप्रमाणें, माझ्या एकदम अंगावर खेकसण्यानें घाबरलेली उषा एकदम माझ्या खोलीतून धावतच निघून गेली. त्या गडबडीत चोवीस तास सारखी तिच्या हातात असणारी भावली निसटून पडली; ती उचलून घेण्याचेंहि तिला भान राहिलें नाही. तोंडात आलेलें अस्फुट आक्रंदनाहि आईचा आधार मिळाला तेव्हा कोठें प्रकट झालें. खोलीच्या दारांत पडलेली तिची भावली उचलून मी तिच्या घरांत फेकून दिली आणि जणू काय काहीच विशेष झाले नाही अशा किंचित् बेपर्वाईच्या आविर्भावानें मी परत अनतरावाजवळच्या खुर्चीवर येऊन बसलें.

थोडा वेळ कोणीच काही बोललें नाहीं. बाह्यात्कारीं राखेचा गोळा दिसणाऱ्या पण अंतःकरणात धुमसणाऱ्या निखाऱ्यासारखी माझ्या मनाची अवस्था झाली होती. मी वरून बेपर्वाईचें नाटक करीत होतों

खरा, पण नक्कल पाठ नसलेल्या नटाचें अवधान जसें सारें पडद्या-मागच्या प्रॉम्टरकडे लागून राहिलेले असतें, तद्वत् माझें चित्त अनंत-रावाच्या मनाचा ठाव घेण्यांत गुंतलें होतें. त्याच्या देखत आताच प्रसंग घडून यावयास नको होता असें आता मला वाटूं लागलें. पण पाणी वाहून गेल्यावर बांध बांधण्याप्रमाणेंच या वाटण्याचा आता कांहीं उपयोग नव्हता.

या घटनेचा अनंतरावाच्या मनावर काय परिणाम झाला असावा याचा अंदाज घेण्यासाठीं मी त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलें.

त्याचीहि दृष्टि माझ्याकडेच लागून राहिली होती. जणूं तो आपल्या तीक्ष्ण नजरेनें माझ्या अंतरंगाचा ठावच घेत होता. आताच्या माझ्या वागणुकीमुळें त्याच्या मनात उमटलेले कल्पनातरंग त्याच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दृग्गोचर होत होते.

त्याला वाटत असावें—

आनंदाने चिवचिवणाऱ्या चिमुकल्या चिमणीच्या इवल्याशा अंतः-करणात तीक्ष्ण कुठार फेकणारा मी म्हणजे कोणी तरी क्रूर शिकारी आहे—

फुलत्या फुलावर आधणाच्या पाण्याचा सडा घालणारा मी एक अंतःकरणहीन प्राणी आहे--

तो अशा विचित्र तऱ्हेनें माझ्याकडे पाहत होता, कीं त्याच्या नजरे-ला नजर भिडाविणें मला शक्य नव्हतें. मी माझी नजर खिडकीतून रस्त्यावर फेकली. एक काळा, नकटा पोरगा पायात पाढरी मळकी चड्डी व अंगात लांब, लाल व काड्याकाड्यांचा शर्ट घालून व गळ्यात पान-पट्ट्यांच्या साधनांनी भरलेली एक चौकोनी आटोपशीर आकाराची पेटी अडकवून 'पानपट्टी, काडी-बिडी, सिगरेऽऽट' असें ओरडत

चाललेला माझ्या दृष्टीस पडला. माझ्या खोलीत उत्पन्न झालेल्या कोंदट व चमत्कारिक वातावरणातून काही तरी वाट काढण्यास साधन सापडावें म्हणून मी त्या पोऱ्यास हाक मारून त्याच्याजवळून एक सिगारेट-पॅकेट विकत घेतलें.

खुटाळ्यावरच्या कोटाच्या खिशातून काड्याची पेटी काढून मी त्या सिगारेट-पॅकेटमधील दोन सिगारेट्स बाहेर काढल्या. एक मी स्वतः तोंडात धरून दुसरी अनंतरावापुढें करीत म्हटलें—

" हं, घे—"

या माझ्या साऱ्या हालचालीकडे शांतपणें पण शोधक दृष्टीनें पाहणाऱ्या अनंतरावानें एकाच शब्दात उत्तर केलें—

" नको."

मी कृत्रिम विनोद करण्याचा प्रयत्न करीत वरकरणी हसत हसत म्हटलें—

" ऑ ! नको ? अरे गृहस्था, तुझ्या आवडीची म्हणून मुद्दाम ही गोल्डफ्लेक विकत घेतली. नाही तर काय त्या पोऱ्याचं मी देणं लागत होतों, घरीं पिवळा हत्ती शिल्लक असता हे आणखीन् एक पॅकेट विकत घ्यायला ? चल, पाहा तर आमच्या गावच्या सिगारेटची गम्मत."

" तूंच पाहा."

पूर्वीच्याच तीव्र स्वरात अनंतराव म्हणाला—

" वा, अनंतराव आणि सिगारेटचा अव्हेर ! म्हणजे आजचा दिवस अगदीच विलक्षण उगवला म्हणायचा."

मी कृत्रिम हसण्याचा यत्न करीत म्हटलें व एक काडी ओढून माझी सिगारेट पेटविली.

अनंतराव पूर्वीच्याच स्वरांत म्हणाला—

" होय, तूं म्हणतोस तें खरं आहे. आजचा दिवस अगदींच विलक्षण उगवला आहे असं मलासुद्धा वाटूं लागलं आहे. एरवी आताच जो एक चमत्कार माझ्या दृष्टीस पडला तो पडता ना."

त्याच्या भाषणातील खोंच न कळण्याइतका कांहीं मी मतिमद नव्हतों. पण मुद्दाम वेड पांघरून, सिगारेटचे झुरके हवेत सोडीत, मीं अर्धवट स्वगत व अर्धवट प्रकट म्हटलें—

" काय म्हणतोस कोण जाणे बुवा ! "

" हें बघ बाबा," माझा हात एकदम पकडून अनंतराव माझ्याकडे रोखून पाहत म्हणाला— " अशी उडवाउडवी नाही कामाची. आताच्या या प्रकाराचं कारण मला कळलंच पाहिजे."

" कुठला प्रकार अन् कसल कारण म्हणतोस तूं अनतराव ? "

" त्या बिचाऱ्या उषेला तूं आपल्या खोलीतून इतक्या कठोरपणानं कां हाकलून दिलंस, तें मला समजलं पाहिजे. तूं आतल्या खोलीत होतास तेव्हां ती चिमुरडी आपल्या भावलीशीं बोबडेबोबडे बोलत अंगणात खेळत होती. तिची ती लाडिक हसरी छबी आणि तिच्या वेषभूषेंतील पोरकट ऐट पाहून तिला मी आत हाक मारली. प्रथम ती आत येईनाच. पण मी लाडीगोडी केली तेव्हा ती काहीशी भीतभीतच आत आली. आणि आपली चिमुकली दंतपंक्ति उघडून ती काही तरी विचारण्याच्या बेतात होती, इतक्यात तूं आतून आलास आणि एखाद्या निर्दय खाटकासारखा तिच्यावर तुटून पडलास. ती बिचारी घाबरून पळून गेली, याचा अर्थ काय ? "

अजूनहि अनंतरावाच्या नजरेंतील नैष्ठुर्य किंवा आवाजांतील तीव्रता कमी झालेली नव्हती. तो मोठ्या कष्टानें आपला राग आवरूं पाहत होता असें स्पष्ट दिसत होतें.

"याचा अर्थ हाच." मी शातपणें म्हटलें, की "तुझ्या-माझ्या गप्पात उगीच त्या गोड पोरीमुळं व्यत्यय आला असता तो येऊं नये. तूं वर्ष दीड वर्षांनी आलास, तेव्हा तुझ्याशी किती बोलूं न् किती नको असं मला झाल आहे. त्यात कसलाहि खंड पडता कामा नये म्हणून त्या मुलीला मी परत पाठवली इतकंच."

"हें कारण तुझं तुला तरी पटतं का? बाबा, मी तुला एकदा सांगितल, तेंच पुन्हा एकदा सांगतों, कीं उडवाउडवी करून भागणार नाहीं. मी वर्ष दीडवर्षानं तुझ्याकडे आलों खरा; पण काहीं मी आजच नाही ना निघालों, की साऱ्या जन्माचं संभाषण एका दिवसात घाई-घाईनं उरकून घेतलं पाहिजे? मी सगळी नाताळची सुटी इथंच घालवणार आहे ना? मग तुला एवढी घाई कसली झाली?......"

"अरे बाबा, तूं राहणार आहेस आठ दिवस हें खरं रे; पण अरे अरसिका, पहिलं फूल, पहिल मूल, पहिलं चुंबन तसाच मित्रभेटीचा पहिला दिवस हें कुठं तुला ठाऊक आहे? पहिल्याची अजब जादू दुसऱ्यात नाही. समजलास?"

"तें मला समजतं. पण तूं त्या पोरीचा इतका कठोर हिरमोड कां केलास तें मला समजत नाही, तें मला समजावून सांगशील तर उपकार मानीन तुझे?"

प्रकरण बरेंच जिकीरीला आलें आहे हें मला समजून चुकलें. आतां तें कसें काय निभावतें याबद्दल मला काळजी वाटूं लागली. म्हणून मी किंचित् मवाळ भाषेंत म्हटले—

"छे रे, मी मुळींच कठोर वागलों नाही! ती मुलगी अगदी भित्री आहे. तिची गंमत करावी म्हणून मी जरा कुठं मोठ्यानं ओरडल्या-सारखं केलं. तों ती आधींच भित्री भागुबाई, गेली पळून रडत झालं!

तुला मात्र वाटलं, की मी तिच्यावर रागावलो म्हणून. पण त्या अर्भकावर रागावण्याचं मला कारण तरी काय?"

"तेंच तर मला कोडं पडल आहे. तुझा स्वभाव मला पहिल्यापासून माहीत. बायकांना दागिन्याचं नसेल इतक तुला मुलाचं वेड. शेजार-पाजारच्या लहान मुलाचा नेहमी आपला तुझ्याभोवती गराडा असायचा. आणि तूंहि पण त्याना प्रत्यक्ष त्याचे आईबाप वागवीत नसतील इतक्या प्रेमानं वागवायचास. त्याच्यासाठी खस्ता खाण्यात तुला उलटा आनंद वाटायचा. मुलाना मारण तर राहोच, पण त्याना रागं भरणं किंवा नुसतं दटावण देखील तुझ्या किती जिवावर यायचं. दुसऱ्या कोणी प्रत्यक्ष आपल्या मुलाना मारल तरी इकडे तुझा जीव सारा दिवस अस्वस्थ व्हायचा...अगदी लहानपणापासून परवापर्यंत मी तुझा हा स्वभाव पाहत आलों आहे. आणि आज तू त्या चिमुरड्या कळीवर रागाचा जो अग्निवर्षाव केलास त्यामुळं मी अगदी आश्चर्यचकित होऊन गेलो आहे. सशाचा एकदम वाघ बनलेला दृष्टीस पडावा तसं मला झालं!..."

"अरे भल्या गृहस्था, लहानपणचा स्वभाव पुढं मोठेपणी बदलत नाही का?"

अनंतरावानें माझ्या स्वभावाचें जें शब्दचित्र काढलें तें माझ्या कल्पना-शक्तीनें माझ्या मनश्चक्षूंपुढें जसेंच्या तसें उभें केलें. फार दिवसानी दृष्टिपथांत आलेल्या एखाद्या पूर्वपरिचित स्थळाकडे पाहताना जसें पूर्वीच्या कांहीं प्रसंगांचे चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें, तद्वत् माझ्या गतायुष्यातील काही मनोरम प्रसंगानी माझ्या डोळ्यांपुढें गर्दी केल्यामुळें माझ्या डोळ्यांत पाणी तरंगू लागले.

"होय बदलतो, नाहीं असं नाही." अनंतराव काहीशा सौम्य

आवाजात म्हणाला. माझ्या मनोदुर्गाला खिंडार पडत चाललेलें त्यानें ओळखले असावें असें मला वाटले. "पण या एका बाबतींत तरी तुझा स्वभाव लहानपणाचाच मोठेपणींहि कायम होता. फार लांब कशाला! तिगस्ता दिवाळीच्या सुट्टीत मी तुझ्याकडे आलों होतों, तेव्हाची काहीं आठवण कर. त्या नारायणरावाच्या शशीवर तुझं किती प्रेम होतं. अन् तीहि लाघवी पोरगी 'बाबा, बाबा' म्हणून एकसारखी तुझ्या मागं मागं असे. तुमचं दोघाच परस्परप्रेम पाहून एखाद्याला वाटलं असत, की खरंच तू न् शशी बाप आणि लेक आहात. गेल्या वर्षापर्यंत तुझा अपत्यस्नेह असा लहानपणाइतकाच जागृत असता, आज तूं त्या उषेशी असा कठोर का वागलास?... आणि खरंच, विचारायचं राहिलंच तुला. काय रे, आता ती शशी कुठं गेली? अन् जाताना तिनं तुझ्या अंतःकरणातील वात्सल्याचा अमृतकुंभच नेला वाटतं! म्हणून तू असा आता शुष्क झालास?..."

आता गंभीर होण्याची माझी पाळी होती.

अनंतरावाने ओघानेंच केलेल्या शशीच्या आठवणीनें मघाशी माझ्या डोळ्यात तरगणाऱ्या पाण्याचें आसवात रूपांतर केलें! मी आर्त स्वरानें उत्तर केलें—

"अनंतराव, तू थट्टेनं म्हणालास पण तीच कठोर वस्तुस्थिति आहे. शशी येथूनच काय, पण या लोकातूनहि निघून गेली. आणि तिनंच माझ्या अंतःकरणातील वात्सल्याचा अमृतकुंभ छिन्नविच्छिन्न करून टाकला आहे. आणि म्हणूनच मी आताशा, आज उषेशी वागलों तसाच, बहुतेक सगळ्या मुलांशी कृत्रिम कठोरतेन वागतों आहे..."

" पण असं व्हायला कारण तरी काय झाल ? "

" कारण ? ती एक संपूर्ण गोष्टच आहे. तुला या गोष्टींतील पात्रांचा थोडाबहुत परिचय आहे. या गोष्टीचा आरंभहि तू पाहिला आहेस. आता तिचं करुण पर्यवसानच काय तें तुला जाणून घ्यायच आहे ? "

" होय, आणि तेंहि तुझ्याकडूनच."

" माझ्याखेरीज तें दुसऱ्या कुणासहि सागता येणार नाहीं." मी ती हकीकत सागण्यास प्रारभ केला– " तुला माहीतच आहे, कीं मला अगदी लहानपणापासून मुलाचा ळळा सर्वात आधिक. माझा दिवसाचा निम्मा अधिक काळ या बाळगोपाळाच्या संगतीत जायचा, त्यामुळं मला तें एक प्रकारचं व्यसनच जडून गेल होतं. परंतु या चाळींत राहायला आल्यापासून माझं तें व्यसन अपूर्तच राहिलं. कारण या चाळीत सहा बिऱ्हाड; पण एकाहि बिऱ्हाडात मूल नव्हतं. त्यामुळ तलफ फार दिवस न भागल्यामुळं व्यसनी माणसास जसं खुळावल्यासारखं होतं तशीच काहीशी माझी अवस्था झाली होती. पण एके दिवशीं संध्याकाळी मी नेहमीप्रमाणं ऑफिसमधून येऊन असा खोलीच दार उघडीत होतों, इतक्यांत दोन अडीच वर्षांची एक छोकरी 'बाबा, बाबा' करीत माझ्या पायाशी घोटाळूं लागली. बराच उकाडा झाल्यावर पडलेल्या छोट्याशा पावसाच्या सरीनंहि जसं मनाला बरं वाटतं तसं त्या मुलीच्या दर्शनानं मला झालं. मीं पटकन् तिला उच-लून घेतली. हातातोंडात कोंबलेल्या चॉकोलेटच्या वड्यामुळं तिचं सारं अंग चिकट-चिकट झालं होतं. केसाच्या न विचरल्यामुळं झिपऱ्या झाल्या होत्या. धुळींत खेळल्यामुळं अंगांतील मलमलीच्या छोट्या शर्टला खाकी सदऱ्याची कळा आली होती. पण मला या तिच्या

मळक्या बाह्यवेषाचं काहीच वाटलं नाही. धुळींत न खेळतील तर तीं मुलं कसलीं, असं मला नेहमी वाटे.

त्या मुलीला उचलून घेऊन मी तिच्याकडे पाहतच राहिलों. पोर मोठी लाघवी यात शंका नाही. तेवढ्या लहान वयातसुद्धां ती फार मिस्किल व वात्रट होती. तिच्या काळ्याभोर डोळ्यांत काही निराळंच पाणी खेळत होतं. वयाच्या मानानें ती बोलेहि फार. त्यामुळं तिची माझी चागलीच गट्टी जमली.

तिला खोलीत आणल्यावर मी चहा तयार केला. तिच्यासाठी थोडा शिराहि बनवला. मुलाना काय, कोणी खायला देईल तो दोस्त वाटतो. खाणंपिणं होईतों मी तिच्या बोबड्या बोलाचं कौतुक करीत होतों. तिला तिचं नाव विचारलं, की तेवढा प्रश्न मात्र तिला मुळीच समजत नव्हता. त्यामुळं ही नवीच आलेली छोकरी कोण कुणाची, हे काही कळेना. कदाचित् शेजारच्या एखाद्या बिऱ्हाडकरूकडे कोणी बोलावसायला किंवा पै-पाहुणा आला असेल व त्यापैकीच ही मुलगी असावी, असा मी तर्क केला. सुंदर फुलाची जात कळली नाही म्हणून त्याच्या सुगंधात थोडाच उणेपणा येतो!

ती पोरहि जणूं मी तिचा फार दिवसाचा सोबती असल्यासारखी माझ्याशीं खेळूं लागली. माझ्या खोलीत तिला जें जे काही हवंसं वाटलं तें तें तिनं मागून घेण्याचा सपाटा सुरू केला. आणि तिच्या त्या चिमुकल्या मागण्या पुरविताना मला अंगीं कर्णसंचार झाल्या-सारख वाटल.

त्या दिवशी फिरायला जायचंहि मला भान उरलं नाही. तिच्या मधुर खेळकर संगतींत संध्याकाळ पांखरासारखी केव्हा भुर्रकन् उडून

गेली तें कळलंहि नाही. पुष्कळ दिवस हरवलेला ठेवाच पुन्हा अचानक हाती लागावा तसं मला झालं होतं. त्या सौख्यसुधेचं पान करण्यात काळकेतूचं भान कोठून राहणार ?

आमच्या गप्पा व हास्यविनोद ऐन रंगांत आला असता, कोठून तरी हाक ऐकू आली—

'शशी, ए शशी, अग शशीऽऽ'...

मी तर्क केला ती हाक शशीच्या आईची असावी.

'आये, आये...' असं आपल्या बोबड्या वाणीनं उत्तर देऊन शशी निघाली. ती कुठं जाते हें पाहायची मला उत्सुकता होतीच. मीहि उठलें व शशीला खोलीबाहेर पोंचवण्याच्या निमित्तानं बाहेर आलें.

माझ्या जाप्त्याच्या पलीकडच्या तिसऱ्या जाप्त्याच्या दाराशी उभी राहून शशीला तिची आई हाक मारीत होती. शशीबरोबर मला येताना पाहून ती पटकन् आत पळाली. क्षणमात्र चमकलेल्या विद्युल्लतेन चालत असलेल्या वाटेची ओझरती कल्पना यावी तद्वत् तिच्या त्या ओझरत्या दर्शनानं मला तिच्या स्वरूपाची पुसट कल्पना आली.

शशीची आई म्हणजे शशीची सुधारून वाढविलेली आवृत्तीच, असं मला वाटलं.

शशीला तिच्या दारात पोंचवून मी परत फिरलें. गेले पंधरा दिवस रिकाम्या पडलेल्या त्या जापूत्यांत शशीचं नवीन बिऱ्हाड आलं असावं असा मी तर्क केला. हें बिऱ्हाड कोण, कुठलं, कसं काय असावं, वगैरे प्रश्नाचा स्वतांशींच विचार करीत मी खोलीत परतलें.

खोलीत पाऊल टाकलं तेव्हा खोलीतला विद्युद्दीप लागला असून

त्याचा खोलीभर स्वच्छ उजेड पडला होता. मघांशी अर्धवट अंधारात खोलीतील साऱ्या वस्तु कशा उदास दिसत होत्या त्या आता प्रकाशान उजळल्यामुळं जणू आनंदानं हसत आहेत, असं मला वाटलं.

गेले कित्येक दिवस माझ्या जीवनात बालभानु अस्तप्राय झाल्यामुळ त्यावर एक प्रकारच्या दाट मनौदासीन्याचा अधार पसरला होता. पण आज शशीच्या झालेल्या उदयामुळं आत्यस्नेहाचं सुखकर चांदणं पडण्यास सुरुवात झाली होती. शशीच्या दर्शनानं इतके दिवस माझ्या अंतःकरणात सुषुप्तेत असलेल्या वात्सल्यसागरास भरती आली होती व त्यामुळं माझ्या मनाच्या किनाऱ्यावर आनंदवीची उसळत होत्या.

आणि मग रोज सकाळ सध्याकाळ शशीचा तळ माझ्या खोलीत पडूं लागला. दुपारच्या वेळेस मी ऑफिसला जाई तेवढाच वेळ काय तो आमच्या विरहाचा. बाकी सर्व वेळ शशी माझ्या पायात लुड-बुडत असायची. माझ्या खोलीत तर शशीनं आपलं एकछत्री साम्राज्यच स्थापन केलं होतं म्हणायला हरकत नाही. खोलीत व्यवस्थितपणा व टापटीप ठेवण्यांत माझा हातखंडा असे, तर आमच्या शशीला माझ्या खोलीला एखाद्या वस्तुसंग्रहालयाच स्वरूप आणून देण्याची मनापासून आवड असावी असं दिसे. पण, या विरोधातून कौतुक-मिश्र आनंद व सुख याचा जन्म होई.

शशीच्या बिऱ्हाडाविषयीं आडून आडून मिळाली तेवढी माहिती मी मिळवली. तिच्या घरीं अवघी इन् मीन तीन माणस होती. ती, तिची आई इरावती, व तिचे वडील नारायणराव. इरावती वीस-

बावीस वर्षांची तरुणी असावी. ती रूपानं दहाजणींत उठून दिसेल अशी होती. तिच्या रुबाबदार वागणुकीचा दुसऱ्याच्या मनावर विलक्षण परिणाम होत असे. ती अतिशय नीटनेटकी व टीपदार गृहिणी होती. तिनें आपला गरिबीचा संसार इतक्या काटकसरीन व कौशल्यानं चालवला होता, की त्याच मला राहून राहून कौतुक वाटे.

शशीचे वडील नारायणराव हे कोणत्याशा एका छापखान्यात नोकरीस होते म्हणे. त्याचं बिऱ्हाड आमच्या चाळीत येऊन कैक दिवस झाले, तरी मला त्याच नुसतं दर्शनहि घडलं नाही. मग ओळखदेख, बोलणं-चालण तर दूरच राहिल. ती स्वारी सकाळी सहा साडेसहाच्या आत जी घराबाहेर पडायची ती बाराला जेवायला घरी यायची. अन् फिरून एकाला घराबाहेर टाकलेलं पाऊल रात्री नवाच्या आत काही घरी दृष्टीस पडायचं नाही.

स्वारीच्या अशा विक्षिप्त नोकरीमुळं शशीची आणि त्यांची गाठ क्वचित्च पडत असे. त्यामुळ नारायणराव तिचे प्रत्यक्ष वडील असूनहि, शशीला ते अगदी परके वाटत. एक तर क्वचित् सणासुदीच्या दिवशीच काय ते शशीला ते घरी दिसायचे. एरवी रोज ती निजून उठण्या-पूर्वीच जे नारायणराव घरातून बाहेर पडावयाचे ते रात्री जेवून खाऊन ती झोंपी गेल्यावर परत घरी यायचे. त्यामुळं बापलेकीचा सहवास मुळीच घडून येत नसे. त्यातून नारायणरावाना मुलाबाळाची आवड मुळीच नसावी असा त्याच्या तुसडया वागणुकीवरून मी कयास बाधला होता.

आणि हा माझा कयास बरोबरहि होता. लहान मुलाच्या बाबतींत ज्या काहीं गोष्टी पुरुषानींच करायला हव्या असतात तसल्या प्रकारांना शशी घरी अगदीच पोरकी पडली होती. त्यामुळ बाध सुटलेल्या

पाण्याप्रमाणें शशी स्वैर वाहत चालली होती. मग नारायणराव जें पितृसुख शशीला देऊं शकत नव्हते तें तिला माझ्याजवळ लाभूं लागल्यामुळं शशी मला अधिकच चिकटली यात नवल नाही.

तिला मी मजबरोबर केव्हा केव्हा बाहेर हिंडायलाहि नेऊं लागलें. रविवारी एखादवेळ एखाद्या 'गाती, नाचती, फिल्म'च्या मॅटिनी शोलाहि मी तिला घेऊन जाई. या देशी बोलपटाच्या धागडधिंग्यांतलं म्हणजे तिला काहीं समजत होतं असं नाही; पण त्यातील पात्र गाऊं लागली, की शशीला गम्मत वाटे आणि तीहि मग त्या आलापांबरोबर आपण ताना घेऊं लागे. आणि तिच्या या मिस्कीलपणाचा आनंद लुटायला मिळावा म्हणून मी तिला केव्हा केव्हां बोलपट पाहण्यास घेऊन जात असे, इतकच.

अर्थात्‌च मी शशीचं असं कोडकौतुक करी याचा इरावतीबाईंना आनंद होई. आणि आपल्या गुणी अपत्याचं दुसऱ्यांनी केलेलं कौतुक कोणत्या वत्सल मातेस प्रिय होणार नाही? इरावतीबाईशीं बोलण्याचा मला प्रसंग फारसा येण्याचं कारणच नव्हतं. आणि आलाच तसा एखादा प्रसंग, तर आमचं तें संभापण केवळ कारणापुरतं जुजबी स्वरूपाचं असे. तथापि शशीला कुठं बाहेर न्यायची झाली, तर मी तिच्याकरवीच इरावतीबाईना परवानगी विचारूनच नेत असे. आणि शशीची वेणीफणी करून, तिचं अंग स्वच्छ करून व तिला बाहेर जावयाचे कपडे घालून त्या तिला मजकडे पाठवीत, यावरून त्याची सम्मति अगदीं उघड होण्यासारखी होती. आणि मी शशीला घेऊन जात असता दाराशी उभ्या राहून कैक वेळा तरी आमच्याकडे कौतुकाच्या आणि कृतज्ञतेच्या नजरेनं पाहताना त्या माझ्या दृष्टीस पडल्या होत्या.

असे सुमारें पाच-सहा महिने गेल्यावर मुंबईच्या 'बालक' मासिकाचे संपादक एकदा माझ्याकडे आले होते त्याना आमची शशी फार आवडली. आणि आपल्या मासिकाच्या मुखपृष्ठावर छापण्यासाठी या छबकडीचा फोटो काढून द्या असा त्यानी मला आग्रह केला. मला त्याची ती कल्पना इतकी आवडली, की काही बोलायची सोयच नाही. त्याच दिवशी आमच्या एका फोटोग्राफर मित्राकडे जाऊन आम्ही शशीच्या निरनिराळया तीनचार पोझेसूचे फोटो काढवून घेतले. या निरनिराळ्या पोझेसूपैकी जी पोझ आमच्या त्रिवर्गाच्या मतें सरस ठरेल तो फोटो मासिकात छापायचा असं आम्ही ठरविलं.

पण त्या फोटोला मुहूर्त कांही चागला लागला नाही, असं पुढं घडून आलेल्या गोष्टीवरून आता म्हणावंसं मला वाटत.

त्या फोटोग्राफचे प्रिंट्स काढून मी, संपादक व तो फोटोग्राफर यांनी आपआपसात चर्चा करून त्यापैकी एक फोटो प्रसिद्धीसाठी म्हणून नक्की केला. त्याचा एक वेगळा चागला प्रिंट फोटोग्राफरकडून काढवून तो शशीच्या वडिलाना दाखवायचा व तो प्रसिद्ध करण्याबद्दल त्याची परवानगी घेऊन तो संपादकाकडे रवाना करायचा, एवढीच आता माझ्याकडे कामगिरी राहिली.

हा वेळपर्यंत नारायणरावाचं जरी मला मधून मधून केव्हां केव्हां दर्शन झालेलं असलं, तरी त्याच्याशी बोलण्याचा प्रसंग आजवर कधीच आला नव्हता. शिवाय त्या माणसाच्या त्या ओबडधोबड आठाळलेल्या चेहऱ्याकडे पाहिल, की त्याच्याशी बोलण्याचा प्रसंग आणूच नये असं मला वाटे. पहिल्याच खेपेस बोलण्यास सुरुवात करून मुलीचा फोटो मासिकात छापायला परवानगी देण्याचा विषय काढणं मला जरा कसंसंच वाटलं.

म्हणून मी एक निराळीच उपाययोजना केली.

नारायणरावानी आजवर कधीच न काढलेला शशीचा फोटो मी काढवून घेतला; इतकच काय, पण तो एका मासिकात छापून आणविण्याचीहि मी तजवीज केली हें पाहून इरावतीबाईना खास आनंद वाटेल असा तर्क बाधून, त्या बाजूनंच घोरपड सोडायचं मी निश्चित केलं.

त्याप्रमाणं त्या दिवशी संध्याकाळी घरी येतांना शशीचा तो फोटो खिशांत घेऊन आलों, आणि शशीच्या दारात उभा राहून मी हाक मारली—

'शशी, शशी, ही पाहिलीस का जम्मत? हें बघ मी तुला काय आणल आहे तें!'

धन्याची हाक कानी पडताच आनंदान उड्या मारीत धावणाऱ्या मोत्याप्रमाण माझा शब्द ऐकूं येताच आनदान नाचतच शशी बाहेर आली. मी काय जम्मत आणली आहे हे पाहायच्या हेतूनं इरावतीबाईहि दाराशी येऊन उभ्या राहिल्या.

मलाहि तेच हवं होतं.

मी खिशांतून फोटो काढून तो शशीच्या हातात देत म्हटलं—

'हा बघ तुझा फोटो, कसा आहे छान! ...जा, आईला नेऊन दाखव.'

शशीनं निमूट माझी आज्ञा पाळली.

फोटो पाहण्याच्या उत्सुकतेनं इरावतीबाई दाराबाहेर आल्या. ती संधि साधून मी त्याना उद्देशून म्हटल—

'हा शशीचा फोटो मुंबईच्या 'बालक' मासिकांत छापण्यासाठीं

काढला आहे. तेवढा नारायणरावांना दाखवून तो छापण्याबद्दल त्याची सम्मति घेण्याचं काम कराल का माझ्यासाठी ?...'

इरावतीबाईनी फोटो पाहून झालेला आनंद आपल्या विस्फारित नेत्रांच्या द्वारे प्रगट करीत हळूच म्हटलं—

'पाहीन प्रयत्न करून.'

आता आपलं काम खातरीनं होईल अशा आशेवर शशीला घेऊन मी माझ्या खोलीकडे वळलों, व नेहमीप्रमाणं आमच्या गप्पासप्पा व खेळ सुरू झाला.

त्यानंतर आठ दिवस झाले तरी शशीचा तो फोटो इरावतीबाईकडून परत आला नाही, त्यामुळ मला थोडी रुखरुख वाटूं लागली. कार्यसिद्धीबद्दल मनात काही संशयाचा खटका राहिलेला असला म्हणजे मार्गात अपशकुनाची मालिकाच भेटूं लागते, तस माझं झालं. नारायणरावाची सम्मति मिळेल की नाही याबद्दल माझ्या मनात थोडा खटका होताच, पण इरावतीबाईच्या प्रयत्न करून पाहण्याच्या आश्वासनामुळं मला काहीसा धीर वाटत होता. पण, डॉक्टरच्या गुळमुळीत वागण्यानं जशी रोग्याच्या पोटातील भीति वाढते तद्वत् फोटो परत येण्याला जसजसा अधिकाधिक विलंब होत गेला तसतसं माझ्या मनातील संशयाच्या बीजाचं भीतीच्या रोपट्यांत रूपांतर होऊं लागलं.

शिवाय या आठ दिवसांत पुन्हा फोटोचा प्रश्न इरावतीबाईकडे काढावा म्हटलं, तर त्या तशा सवडीनं भेटल्याहि नाहीत. शशीला हाक मारण्याच्या निमित्तानं मी दोन-चार वेळां त्याच्या दाराशी डोकावण्याचा यत्न केला. हेतु हा, की त्या निमित्तानं इरावतीबाई

दाराशी दिसल्यास त्यांना फोटोबद्दल खुलासा विचारून पाहावा. पण माझा हा प्रयत्न चारहि वेळ विफलच ठरला. इरावतीबाई दाराशीं येण्याचं तर राहोच, पण माझी हाक ऐकताच त्या चटकन् आंत सैपाक-गृहांत जात, असा मला अनपेक्षित अनुभव आला. या घटनेचा मला विस्मय वाटला. याच कारण काय असावं हे गूढ सोडवण्यात मी गुंतलो असता आणखी एक चमत्कारिक गोष्ट माझ्या नजरेस पडून माझा विस्मय द्विगुणित झाला.

ती गोष्ट हीच, कीं आता-आताशा शशीला माझ्याकडे पाठविण्यास इरावतीबाई फारशा उत्सुक नसाव्यात असं दिसलं. मी नेहमीप्रमाणं शशीला फिरावयास नेण्याचा विचार त्याना कळवला, तरी पूर्वीप्रमाणं शशीचा नट्टापट्टा करून पाठविण्याचं त्या करीत नसत. या त्यांच्या वर्तनाचा, आळस का नाखुषी, काय अर्थ घ्यावा हें मला समजेनासं झाल.

तथापि मलाच शशी अलीकडे अतिशय आवडती झालेली असल्या-मुळं मी तिचं कौतुक पूर्वीप्रमाणंच सुरू ठेवलं होतं. आणि त्या चिमुरडीला तर आतां माझा इतका ळळा लागला होता, की मी एखादा दिवस कुठं बाहेरगावी गेलें, तर शशी म्हणजे रडून घर डोकीवर घेत असे. अशा मनःस्थितीत शशी मला विसंबून राहणं शक्यच नव्हतं.

त्यामुळं आमची मैत्री पूर्ववत् चालूच राहिली.

तथापि त्या फोटोचं काय झालं हे एक गूढच राहिल्यामुळ माझ्या मनात एक संशयमेघ तरंगत होता. एके दिवशी शशीच्या फ्रॉकच्या खिशांत कसले कागद आहेत हे मी सहजींच पाहण्यासाठी घेतले. तों त्या चिटोऱ्यात शशीच्या त्या फोटोचे दोन तुकडे मला आढळून आले.

तेव्हां मला या गूढाचा उलगडा झाला.

एवढ्या हौसेन मी मुद्दाम काढून दिलेला फोटो आपल्या हातून फाटला याचंच इरावतीबाईना वैषम्य वाटत असावं व त्यामुळंच त्याना माझ्यापुढं येण्याची लाज वाटत असावी, अशी मी समजूत करून घेतली.

फाटला तर फाटला फोटो. त्याचं एवढं काय! पुन्हा आणखी प्रिंट काढून घेऊन इरावतीबाईना द्यावा व नारायणरावाची परवानगी घेण्याबद्दल विनवावं असं मनाशी ठरवून मी त्या फोटोग्राफरकडून पुन्हा एक प्रिंट काढून आणला, आणि पूर्वीच्या खेपेप्रमाणंच दारातून शशीला हाक मारून मी तो फोटो तिच्या स्वाधीन केला. इरावतीबाई आसपास असल्यास त्याच्याकडे पुन्हा एकवार ती गोष्ट काढावी या उद्देशानं मी दारातून आत डोकावून पाहिलं, तो तिथं कोणी बिन-ओळखीच्या दोघी स्त्रिया बसलेल्या दिसल्या. त्यामुळं मला तिथं उभं राहणं अशक्य झालं. शशी मात्र फोटो घेऊन केव्हाच घरात पसार झाली होती.

शशीच्या घरी आलेल्या पाहुण्या नंतर पांच-सहा दिवस तिथं तळ देऊन राहिल्यामुळं मला फोटोचा विषय इरावतीबाईकडे त्या अवधीत काढता आला नाही. आणि नतर दोन दिवसानी संध्याकाळी ऑफिसातून घरी येऊन पाहतो तो काय?

शशीचं बिऱ्हाड चाळीतून निघून गेलेलं!

मला परमावधीचं आश्चर्य वाटलं. काही गंधवार्ताहि नसतां शशीचं बिऱ्हाड एकाएकी कसं निघून गेल याचं मला गूढ पडलं.

शशीशिवाय मला चैन पडेना. तिचं दर्शन तरी व्हावं म्हणून तिच्या नव्या बिऱ्हाडाचा पत्ता काढण्याचं मी ठरवलं. आमच्या चाळीच्या मालकाची गाठ घेऊन त्याला शशीचा नवा पत्ता माहीत असल्यास पाहावं असा बेत केला.

आगीनं पोळलेल्यानं गार पाण्याच्या आशेनं उडी घ्यायला जावं आणि तिथं पाण्याऐवजी कढत लाव्हा रस निघावा, तशीच कांहीशी माझी अवस्था झाली!

चाळीच्या मालकानं जी हकीकत सांगितली तीवर माझा विश्वासहि बसेना.

शशीवरील माझ्या प्रेमाआड शशीच्या आईबद्दलची दुष्ट वासना दडली आहे, असा नारायणरावांनी ग्रह करून घेतला. मी काढून दिलेल्या फोटोचे त्यानीच फाडून तुकडे केले, आणि माझ्यासारख्या पापी नजरेच्या माणसाकडे शशीला न पाठविण्याबद्दल त्यांनी आपल्या बायकोस बजावलं. इरावतीबाई सारा खरा प्रकार जाणून होती. शशी माझ्याखेरीज राहणं अशक्य झालं होतं.

मी दुसऱ्या खेपेस फोटो पुन्हा काढून दिले त्या वेळेस आलेल्या पाहुण्या बाईच्या हाती ते गेले. अर्थात्च इरावतीबाईना त्या फोटो-बाबत योग्य तो खुलासा करणं प्राप्तच झालं. त्या बाईनीं कौतुकानं फोटो नारायणरावाना दाखवले.

झाल! त्याना आपल्या बायकोचाहि संशय येऊं लागला. गृहस्थानं तावडतोब चाळीतून बिऱ्हाड उचललं.

आणि त्याच्या या संशयाला कारण काय म्हणशील, तर—

लग्नाचं वय असूनहि माझं लग्न झालेलं नव्हतं हेंच!!

पुढची हकीकत अगदींच थोडी आहे.

या घटनेचा माझ्या मनावर फार खोल परिणाम झाला. त्यांत दुसरीकडे बिऱ्हाड नेल्यापासून शशी फार आजारी पडली व त्यात तिचा अंत झाला असं काही दिवसानीं मला कळलं.

माझं मन मला म्हणूं लागलं–

'तूंच, राक्षसा तूंच त्या अर्धस्फुट कलिकेचा बळी घेतलास!'

आणि तेव्हांपासून मी मनाचा निश्चय केला, की पुन्हा म्हणून दुसऱ्याच्या मुलाला हात नाही लावायचा! कारण मन दुर्बल आहे. बालकाच्या मोहांत गुरफटून पुन्हा तें वाहात जाईल अशी भीति वाटते. म्हणून मोहाचा पहिलाच प्रसग टाळण्यासाठी मी आज उषेशी वागलों, तशा कठोरपणानं अलीकडे सर्व मुलांशी वागतों. माझ्या स्वभावाला अशी वागणूक लांच्छनास्पद आहे खरें, पण शशीचा बळी घ्यायला कारणीभूत झालेल्या माझ्या स्वभावाला हे शशिलांच्छन कायमचं चिकटलेलं राहणार!"

# शांति-दूत

तो दिवस बुधवारचा होता.

रोजच्याप्रमाणे मी सकाळी उठून पर्वतीवर जाऊन फिरून परत आलों होतो. नव्या वस्तीतील एका चाळीतील एक गाळा भाड्यानें घेऊन मी तेथें राहात होतो. हातातील बारीक लवचीक छडी उजव्या हाताच्या चार बोटांमधून फिरवीत मी आमच्या चाळीच्या फाटकातून आवारात शिरत असतां समोरच्या जिन्यावरून कोणी तरी अपरिचित गृहस्थ उतरत असल्याचें माझ्या नजरेस आलें. आमच्या चाळीचा जिना चाळीच्या एकंदर घाटाला शोभेसाच होता. तो जितका निमुळता होता तितकाच अरुंद होता. जिन्याच्या त्या अरुंद पायऱ्या पाहिल्या, कीं चिमुकल्या पायांच्या चिनी बायकांच्यासाठीच त्या खास तयार केल्या असाव्यात अशी कल्पना मनात येई. सर्कशीच्या तंबूंत स्त्री-पुरुषांच्या जागा विभागण्या-

साठी ज्याप्रमाणें ओबड-धोबड दोऱ्या बांधलेल्या असतात, त्याप्रमाणे जिन्याच्या दोन्ही बाजूच्या सरहद्दी दाखविण्यासाठीच जणूं दोन हात उंचीवर दोन्ही बाजूंस एकेक आडवा लांब ओंडका दोन खांबांशी खिळ्यांनी ठोकलेला होता. या दोन्ही ओंडक्यावर दोन्ही हात ठेवून सावकाश एकेक पायरी उतरावी तेव्हा कोठें सहीसलामत खाली पोंचण्याची आशा असे!

अशा त्या जिन्यावरून तो नवखा गृहस्थ दबकत दबकत उतरत असलेला पाहून मला मोठी गंमत वाटली. मी त्याच्याकडे लक्षपूर्वक पाहूं लागलों. जिना उतरण्याच्या त्याच्या पद्धतीवरून त्याचें म्हातारपण उघड होत होतें. आधीच जिना अवघड, तशांत गृहस्थाच्या पायांना वार्धक्यामुळें कंप सुटत असल्यामुळें जिना उतरणें म्हणजे त्या गृहस्थाला पुरंदरावर मोटार चढविण्याइतकें अवघड वाटत असलें पाहिजे. उजव्या हातांतील मध्यम जाडीची काठी आधी खालच्या पायरीवर नीट टेकून, डाव्या हातानें जिन्यावरील कठडेवजा ओंडका घट्ट धरून एकेक पायरी मोठ्या कष्टानें व सावधपणाने उतरणाऱ्या त्या गृहस्थाकडे पाहताच मला त्याच्या दुर्बळ वार्धक्याची कीव आली, व त्याला हात देऊन जिना उतरण्यास मदत करण्यासाठी मी झटकन् पुढें आलो.

पण जिन्याजवळ जाताच मी आश्चर्यानें थक्क होऊन गेलों. त्या गृहस्थाला आधार देण्यासाठीं हात पुढें करण्याचेंहि भान मला राहिलें नाहीं. कालगतीमुळे उजाड झालेल्या अर्धपडीक देवालयाकडे पाहताना जी सादर करुणेची भावना मनात उत्पन्न होते, तीच त्या गृहस्थाकडे पाहून माझ्या मनाची अवस्था झाली.

ते प्रत्यक्ष माझे वडील होते!

पण अगदीं जवळ येईपर्यंत मी सुद्धा त्यांना ओळखूं शकलों नाही,

इतका त्याच्या स्वरूपात बदल झाला होता. वर्षाऋतूंत पाण्यानें खळखळणारा ओढा ग्रीष्मऋतूंत आटून उजाड व भयानक दिसावा तद्वत् त्याच्या देहाची काति व शक्ति नाहीशी होऊन तेथें आता करुणोत्पादक कुरूपता व दुर्बलता याचे आधिराज्य स्थापन झालेले स्पष्ट दिसत होतें !

आणि हा सारा पाच-सहा वर्षांचा इतिहास होता !

मानवी जीवनपथावरून काळाची पावलें किती झपाझप पण निश्चयानें पडत असतात याची आज मला पूर्ण जाणीव झाली.

पाच-सहा वर्षांपूर्वीचा एक प्रसग माझ्या नजरेसमोर विद्युद्वेगानें निघून गेला.

त्या वर्षी मी 'फर्स्ट इअर'ची परीक्षा दुसऱ्यादा नापास झालों. गणित आणि फिझिक्स याच दोन विषयानी गतवर्षीप्रमाणे ह्याहि वर्षी माझ्या पदरात अपयश बाधले होतें. आणि परीक्षेच्या खिडीच्या तोंडाशी हे दोन शत्रु मार्ग रोखून उभे होते तोंपर्यंत त्या खिडीतून पसार होणें माझ्या बाबतींत तरी केवळ अशक्यप्राय आहे असें मला वाटल्यावरून मी महाविद्यालयाबरोबरच उच्च शिक्षण व तदंतर्गत सुखसोयींना कायमचा रामराम ठोकला. बाबाना अर्थात्च ही गोष्ट पसंत पडली नाही. मी एल्एल्. बी. होऊन त्याचा वकिलीचा धंदा पुढें चालवावा अशी त्याची इच्छा होती, व ती तशी असणें अगदी स्वाभाविकच होतें. दोन पिढ्या चालत आलेल्या ज्या धंद्यामध्यें त्यानी स्वतः आपले आयुष्य घातलें होतें त्याबद्दल एक प्रकारची आत्मीय भावना त्याच्या अंतःकरणात उत्पन्न होणें मनुष्यस्वभावास धरूनच होतें. शिवाय या

धंद्यात त्यानीं कमाई व लौकिकहि अल्पावधीत चागला संपादला होता. त्यामुळें घराण्याच्या खानदानी चिजांबद्दल गवयांना वाटतो तसला आपलेपणा वकिलीच्या धंद्याबद्दल बाबाना वाटत असल्यास नवल नाही.

आणि या पिढीजात आपलेपणाच्या पोटीच मीहि याच धंद्यांत पडावें या त्याच्या इच्छेचा जन्म झाला होता. पण, विधिलिखित काही वेगळेंच होतें. माझी स्वतःची इच्छा त्या धद्यात पडण्याची मुळीच नव्हती. कारण या धंद्यास अवश्य असणाऱ्या गुणाची देणगी निसर्गतः मला मिळालेली नाहीं अशी माझी समजूत. याखेरीज या धंद्याकडे माझे मन ओढ न घेण्याचे कारण दुसरेंहि एक होते.

माझे एक भेहुणे मुंबईच्या एका नामाकित फिल्म कंपनीमध्यें बऱ्याच मोठ्या पगारावर काम करणारे एक नट होते. त्याचें लहानपणापासून माझ्यावर फार प्रेम असे. ते जेव्हा जेव्हा आमच्या गांवी येऊन काही दिवस मुक्काम करीत, तेव्हा तेव्हा माझी मोठी चैन असे. ते मला बहुतेक रोज एखादा तरी सिनेमा दाखवीत असत. त्यातील कथानक, निरनिराळे प्रसंग, नटांच्या अभिनयातील कौशल्य, फोटोग्राफीच्या खुब्या, वगैरे अनेक गोष्टी समजावून सागत असत. दोन चारदा दिवाळीच्या किंवा उन्हाळ्याच्या सुटींत मी मुंबईस त्याच्याकडे गेलों असता त्यानीं मला आपल्या कंपनीच्या स्टूडिओमध्येंहि नेलें होतें. तेथील अनेक नवलाईच्या व अपूर्व गोष्टीनी मला इतकें भारून टाकलें, की पुढेंमागें याच धंद्यात पडण्याची मी मनाशी प्रतिज्ञाहि करून टाकली! आणि गुळाला चिकटून राहणाऱ्या मुंगळ्याप्रमाणें मी या कल्पनेला घट्ट चिकटून राहिलो.

या कामी मला बाबांचा तीव्र विरोध होणार हें मला नक्की ठाऊक

होतें, व तो तसा झालाहि. प्रीव्हियसच्या परीक्षेंत लागोपाठ दोनदां गच्चू मिळाल्यावर शिक्षणाचा नाद मी सोडून देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणे बाबाच्या कानावर माझा बेत घालण्याचे ठरवून तशा एखाद्या संधीची मी वाट पाहत होतों. तों माझ्या परीक्षेच्या निकाला-नंतर पंधरा एक दिवसानी, एके दिवशीं रात्रीं, खुद्द बाबांनीच मला आपल्या खोलींत हाक मारली.

मी बाबाच्या खोलीत गेलों, तेव्हा ते रस्त्यालगतच्या खिडकीशीं ठेवलेल्या आरामखुर्चीवर पडून त्याच्या आवडत्या 'गोल्ड फ्लेक'चा मधुर आस्वाद घेत व त्या धुरानें हवेंत विविध आकृति उमटवीत पडले होते. या धूम्राकृति पाहून ते आपल्या मनातील काल्पनिक स्वप्नाची जणूं रेखाचित्रेंच काढीत आहेत अशी एक कल्पना माझ्या मनात येऊन गेली. त्यानी मला का बोलाविलें असावें याचा अंदाज घेण्यासाठी, खोलीच्या दारात थबकून, मी बाबाच्या चेहऱ्याचें निरीक्षण करूं लागलों.

त्या वेळी बाबाचें वय चाळिशीच्या आतच होतें. लहानपणी थोडी-फार तालीम केली असल्यामुळें त्याचे पिळदार व भरीव अवयव डौल-दार दिसत होते. त्याचे तें रुंद कपाळ, गरुड नासिका व पुष्ट गाल यामुळें त्याच्या चेहऱ्याला व एकदर आकृतीला भव्यता व रुबाब प्राप्त झाला होता. पाहिल्याबरोबर पाहणाऱ्याच्या मनात आदर उत्पन्न व्हावा अशी त्याच्या प्रकृतीची एकंदर ठेवण होती. आणि त्यांच्या वकिली-च्या धंद्यांत त्याना त्याच्या बुद्धिमत्तेचा झाला तितकाच त्यांच्या प्रकृतिसौष्ठवाचाहि उपयोग झाला होता.

मी दाराशीं घुटमळतो आहें हें पाहून त्यानीं आपल्या गंभीर व खणखणीत आवाजात हाक मारून म्हटले—

" बापू, ये ना आत, तुझ्याशी मला काही बोलायचं आहे. ये, बैस त्या खुर्चीवर."

सर्कशीतील जनावरें मालकाचा हुकूम पाळतात, तद्वत् मी निमूट त्याच्या आज्ञेप्रमाणें वागलों.

कांहीं वेळ कुणीच काही बोल्लें नाही. मी खाली मान घालून होणाऱ्या वादळाला तोंड देण्यासाठी आत्मशक्ति जागृत करण्याच्या प्रयत्नात होतों. बाबाहि कसल्या तरी विचारात असावेत असे त्याच्या चेहऱ्यावरून वाटत होते. काही वेळानें उरलेल्या सिगारेटचा शेवटचा एक झुरका मारून त्यानीं थोटूक खिडकीवाटे रस्त्यावर फेकून दिलें व खुर्चीत थोडेंसें अंग चाळवून ते मला म्हणाले—

" यंदाहि तू नापास झालास, बापू! माझी कल्पना नव्हती. झालं तें होऊन गेलं म्हणा; त्याबद्दल विचार करण्यात अर्थ नाही. पण हें असंच चाललं, तर तूं एल्एल्. बी. होऊन माझ्या हातचा धंदा आपल्या हाती घेणार केव्हा? आम्ही आता दिवसेंदिवस म्हातारे होत जाणार. तुला तसं पाहिलं, तर न सांगताच या सर्व गोष्टी कळायला हव्यात. सिनेमानाटकाचा नाद सोडून तू अभ्यासाकडे लक्ष देशील, तर यंदा तरी पास होशील......"

मध्येंच त्यानी माझ्या अवनत मुखावर नजर रोखली. त्याच्या मनातून आणखी काही तरी बोलावयाचें आहे हें मी ओळखले. पण मी काही तरी स्वतःच्या समर्थनार्थ बोलावें या अपेक्षेनें ते मध्येंच थांबले होते. त्यांची ही नेहमींचीच पद्धत असे. त्यामुळें ते बोलावयाचे थांबताच मला बोलणें भाग पडलें. मीहि आज खुल्या दिलानें माझें मनोगत बोलून टाकण्याचें ठरविलें व म्हटलें—

" मला तशी काही आशा दिसत नाहीं. गणित आणि फिझिक्स

याचा अभ्यास माझ्या हातून होण्यासारखा नाहीं. मी तरी काय करूं ?"

माझ्या आवाजांत माझी असहायता प्रकट झाली असावी. कारण बाबानी आवंढा गिळल्यासारखें करून हळुवारपणे म्हटलें—

"मग वाटेल तर या दोन विषयाची शिकवणी ठेवून पाहा. असं नाउमेद होऊन कसं चालेल? दोनदां काय, चारचारदा नापास झालेले लोकहि धडपड करून पास झाले आहेत."

"पण, मला तें अशक्य वाटत त्याला मी तरी काय करणार!"

एक कडवट औषधाचा डोस गिळावा तसा आणखी एक आवंढा गिळून बाबा शक्य तितक्या शांत स्वरानें म्हणाले—

"मग, काय करायचं तूं ठरवलं आहेस? तुला एल्एल्. बी. होणं शक्य नसेल तर हायकोर्ट प्लीडरचा अभ्यास कर. दोन पिढ्याचा धंदा तूं पुढं चालवावास यातच तुझं कल्याण आहे."

एखाद्या बरोबरीच्या स्नेह्याशी बोलावें तसें बाबा माझ्याशी बोलत होते. आपल्या वडिलकीचा अधिकार न गाजवतां शक्य तों आपलें म्हणणे सामोपचारानें मला पटवून द्यावें असाच त्याचा विचार असावा, असें त्याच्या बोलण्याच्या पद्धतीवरून मला वाटले. त्यामुळें मलाहि बराच धीर आला व मी अगदी मनमोकळेपणानें बोलूं लागलों—

"पण मला काही या धंद्याची आवड नाही. माझ्या हातून तो होईल असेहि मला वाटत नाहीं. त्यापेक्षा—"

"त्यापेक्षा तुला सिनेमाच्या धंद्यात पडण्याला मी मोकळीक का देत नाही असाच ना तुझा प्रश्न?" बाबा तीव्र स्वरात म्हणाले. त्याच्या रुंद कपाळावर दोन तिरस्कारदर्शक आठ्या पडल्या.

" तूं आपल्या मेहुण्याप्रमाणं लवकरच एक सिनेमानट होऊं इच्छितोस. तूं आपल्या तोंडाला रंग फासून त्याबरोबर आमच्या तोंडालाहि काळोखी फासणार, हें भवितव्य मला स्पष्ट दिसतं आहे ! तुझ्या दैवीं लिहिल असेल तसंच तुझं भवितव्य होणार. तें मला तरी कसं बदलता येणार? पण बापू, तुला अखेरचं निक्षून सागतों, की तुला या घरात राहायचं असेल तर अभ्यास नीट करून वकिलीची परीक्षा दिली पाहिजे, नाहीं तर चारी दिशा तुला मोकळ्या आहेत."

बाबा झटक्यानें आपल्या शयनगृहात निघून गेले. डोक्यांत अनपेक्षित बडगा बसला म्हणजे येतो तसा सुंदपणा माझ्या बुद्धीला काहीं क्षण आला. बाबानी धारण केलेली शातता ही वादळापूर्वीची समुद्राची भीषण शातता होती हें मला आता कळून आलं ! तें मला पूर्वीच कळून येतें तर—?

अर्थात्‌च यानंतर बाबाच्या समोर जाण्याची छाती मला झाली नाहीं. त्याच्या इच्छेप्रमाणें वकिलीचा अभ्यास करणें मला अशक्य होतें व तो न करता घरात राहता येणेंहि शक्य नव्हतें. घर सोडून माझ्या इच्छेप्रमाणें सिनेमाच्या धंद्यात राजरोस पडणें एवढा एकच मार्ग मला आता रिकामा होता व तोच मी अवलंबला.

माझ्या मेहुणाच्या वशिल्यानें लवकरच एका सिनेमा कंपनींत नट म्हणून माझा शिरकाव झाला. आवडीचा व्यवसाय असल्यामळें मी या धंद्यांत लवकरच पुढें सरसावलों. या नव्या वातावरणात व नांव-लौकिकाच्या नशेंत मी इतका व्यग्र होऊन गेलों, कीं मला घरची आठवण क्वचित्‌च होत असे. मी घर सोडून गेल्यावर बाबानींहि एका अक्षरानें कधीं माझी चौकशी केली नाहीं. अशा रीतीनें पडलेली दोन अभिमानी हृदयाची तेढ दिवसेंदिवस कमी न होता उलटी वाढतच

गेली आणि एकमेकाचें संभाषण तर राहोच; पण पत्रव्यवहारहि या अवधींत घडून आला नाहीं!

या गोष्टीला पाचसहा वर्षे झाली होतीं.

आणि आज अगदी अनपेक्षितपणें अशा अनुकपनीय अवस्थेंत बाबा माझ्या दृष्टीस पडले. त्यामळे प्रथमतः मी गोंधळून गेलों. काय बोलावें हें मला सुचेना. बाबाचीहि मजकडे दृष्टि वळली. त्यानींहि मला ओळखलें असावें. कारण, त्याचीहि माझ्याप्रमाणेंच बावरल्या-सारखी स्थिति झाली. पायरी उतरण्यासाठी उचललेला पाय तसाच अधातरी राहिला. आम्ही दोघेंहि एकमेकाकडे नुसते पाहतच राहिलों.

अवध्या सहा वर्षाच्या अवधींत बाबाच्यामध्यें किती पण फरक पडला होता! ते होते त्यापेक्षा दहा वर्षांनी तरी अधिक म्हातारे दिसत होते. त्याच्या पांढऱ्या जरीच्या रुमालातून दिसणारे डोक्याचे केंस व मिशा पार पिकून पाढऱ्या झाल्या होत्या. त्याचे डोळे निस्तेज व खोल गेलेले दिसत होते. दातानी स्वस्थानत्याग केल्यामुळें आता गालफडें मधेंच फाटलेल्या वस्त्राप्रमाणें कळाहीन दिसत होतीं. त्यांचा तो भयाण चेहरा म्हणजे काळाच्या कठोर करणीचा सहा वर्षांचा जिवंत इतिहासच होता. सहा वर्षांपूर्वी मी घर सोडले तेंव्हाचा त्याचा उमदा रुबाब कोणीकडे!

हंपी येथील जुनाट व उध्वस्त इमारती पाहून वाटावे तसे हृदय-स्पर्शी दुःख मला बाबाच्या चेहऱ्याकडे पाहून वाटले. त्यांच्या या अवस्थेला पर्यायानें मीच कारणीभूत झालो, ही कल्पना मनात येताच

तर मला मेल्यापेक्षाहि मेल्यासारखें होऊन गेलें. सहा वर्षेपर्यंत ज्या ताठर अभिमानाचें मी आपल्या हृदयात संवर्धन व सरक्षण केलें होते तो वाऱ्याबरोबर उडून जाणाऱ्या पाचोळयाप्रमाणें क्षणार्धात कुठच्या कुठें नाहीसा झाला. मी पुढे होऊन त्याचा हात धरला व रुद्ध कंठानें हाक मारली—

" बाबा ! "

मी पुढे केलेला हात बाबानीं घट्ट धरून दाबला. भावनातिरेकानें त्यांच्या डोळयातून अश्रु टिबकत होते.

मी त्याना हाती धरून माझ्या बिऱ्हाडीं नेलें. पहिल्या भावनेचा आवेग किंचित् कमी झाल्यावर मी विचारले—

" केव्हा आलात ? "

" आताच ! "

" उतरलात कुठ ? "

" गोपाळरावाकडे."

" इकडे कुणीकडे आला होता ? "

" पलीकडच्या बिऱ्हाडातल्या महस्त्रबुद्धयाच्याकडे त्याच्या सासुरवाडीची दोन मुलं पोंचवायची होती, म्हणून इकडे आलों होतों. तूं इथच राहतोस वाटतं ? "

" हो. ही व ती अशा दोन खोल्या आहेत माझ्याकडे."

" अस्सं."

नंतर थोडा वेळ स्तब्धता होती. आम्ही एकमेकांमधील अतर या मुक्या संभाषणाने जणूं भराभर तोडून जवळ येत होतों, असे मला वाटलें.

थोड्या वेळानें मी विचारलें—

" थोडासा चहा करूं ? "

" हो, हो कर ना ! हवाच आहे मला चहा."

असें म्हणून बाबांनी अंगांतील कपडे काढून खुंटीवर ठेवले, व ते आतील खोलीतील नळावर जाऊन तोंड धुवूं लागले. त्याच्या या कृतीनें त्याच्या मनांतील माझ्याबद्दलची अढी नाहीशी झाली हे मी ओळखलें व त्याना तोंड पुसण्यासाठी टॉवेल देऊन मी स्टोव्ह पेटवूं लागलों.

चहा होईपर्यंत, आमचें पुष्कळ बोलणें होऊन, आमचा पिता-पुत्राचा पूर्वसबंध पुनः प्रस्थापित झाला. मध्यतरी आलेलें अभ्रपटल आता पार नाहीसें झालें व दोघाच्याहि मनाचे आकाश स्वच्छ झाल्याने, प्रेम-सूर्याची किरणें अधिक तेजानें तळपू लागली.

चहा झाल्यावर बाबा परत आपले स्नेही गोपाळराव यांच्याकडे जाण्यास निघाले, तेव्हा जाताना मला आपल्या हृदयाशी धरून प्रेमानें म्हणाले—

" बापू, मी माझ्या दुराग्रहान तुला घराबाहेर काढलं त्याची मला क्षमा कर. तुझ्यावाचून मला म्हाताऱ्याला कोण पाणी देणारं उरलं आहे? मागचं सगळं विसरून जा आणि पूर्वीप्रमाणं घरी चल. तुला सिनेमाच्या धद्यात राहायचं असेल, तरी त्याला सुद्धा आता माझी हरकत नाही. तुझं सुख तेंच आता माझं म्हाताऱ्याचं सुख."

बाबांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागल्यामुळें, त्याच्यानें अधिक बोलवेना. त्यानी तीन-तीनदा मला हृदयाशी घट्ट आवळलें व जणुं इतक्या दिवसाच्या उदासीनतेची परतफेड केली.

बाबा गेल्यावर झालेल्या या घटनेवर विचार करीत मी कॉटवर पडून राहिलों. काळाची करणी कठोर आहे असें म्हणतात; व मलाहि आजपर्यंत तसेंच वाटत होतें, पण आजचा हा पितापुत्र-समेटाचा योग घडून आल्यानंतर मात्र माझ्या या मतांत फरक पडला. काळ कठोर आहे, तसाच तो दयाळु नाही काय? निदान आमच्या बाबतीत तरी मला तो तसा वाटतो. बाबाच्या व माझ्यामध्यें सहा वर्षे वाढलेली तेढ नाहीशी करून आमचा समेट घडवून आणण्याचें शांतिदूताचे काम 'काळा' नेंच केले नव्हतें काय!

# तरुण मन !

कधी नव्हे तो प्रभाकर आज सूर्योदयाबरोबरच जागा झाला. जागा झाल्यावरहि अर्धा-पाऊण तास अंथरुणात लोळण्याचा आपला नेहमीचा कार्यक्रम सोडून आज प्रभाकर पाघरूण झटकून पलंगावरून उठला. त्याने पूर्वेकडील खिडकी सताड उघडून बाहेर नजर फेकली. आरक्त सूर्यबिंब क्षितिजाच्या खिडकीतून हळूच डोकावून आपल्या पृथ्वीवल्लभेकडे प्रेमकटाक्ष फेकीत आहे, असें त्याला वाटले.

त्या मोहक देखाव्याकडे सतृष्ण नजरेने काही क्षण प्रभाकर पाहत राहिला. नंतर तो जणूं एकदम कांही आठवल्यासारखें होऊन त्या तंद्रीतून भानावर आला. खिडकीतून तो मागे वळला. त्याने खोलीभर नजर फेकली. सूर्याचे कोंवळे प्रभातकिरण पसरून खोली कशी उत्साहानें भरून गेली होती. त्याचें मनहि काही एका उत्सुकतेनें भरून गेलें होतें.

आज त्याला जिकडे तिकडे नुसता उत्साह व आनंद भरून राहिला आहे, असें वाटत होतें. दुःखाची निशा संपून आज सुखाच्या उषेचा उदय होणार होता, अशी त्याचें मन त्याला ग्वाही देत होतें.

उत्तर ध्रुवावरच्या प्रवाशाप्रमाणे प्रभाकरानें गेले चार महिने विरहाची निशा साहिली होती. चार महिन्यापूर्वी पहिल्या बाळतपणासाठीं मुक्ता माहेरी गेली, तेंव्हापासून एकातवासाचें जिणें प्रभाकराच्या नशिबी आलें होते. मुक्तेच्या प्रिय संगतीचा सुखकर लाभ प्रभाकराला जेमतेम वर्षभरच मिळाला होता. दीड वर्षापूर्वी त्याला पुण्याला नोकरी मिळाली. त्यानतर एक-दोन महिन्यातच त्यानें स्वतंत्र बिऱ्हाड केले. नव्या नवतीची नवरी आणि ताज्या हौसेचा नवरा! स्वतत्र ससारांत रमलेल्या त्या प्रेमी पाखराना वर्ष केंव्हा गेलें तें कळलेंहि नाही!

मुक्ता माहेरी गेल्यापासून मात्र प्रभाकराला करमेनासें झालें. ओकें ओकें घर आपल्याला खायला उठतें आहे, असा त्याला भास होई. प्रत्येक वस्तु त्याला मुक्ताची आठवण करून देई. त्यामुळें त्याला घरात स्वस्थता मिळेनाशी झाली.

मुक्ता गेल्यामुळे घराला जुन्या बाजाराची कळा येत चालली. प्रभाकराच्या जेवणाखाण्याचे हाल होऊं लागले. त्याच्या कपड्यालत्त्याची नीट निगा राहीनाशी झाली.

प्रभाकर वैतागून गेला. केंव्हां एकदा बाळंतपण संपून मुक्ता घरी परत येईल, असें त्याला होऊन गेलें.

त्या सर्व दुःखाच्या ढगात एकच सुखाची विद्युल्लता चमकली.

मुक्ता सुखरूप बाळंत होऊन तिला मुलगा झाला!

प्रभाकराला केवढा तरी आनंद झाला. त्या महिन्याचा पगार होताच त्यानें आपल्या मित्रमंडळींना एक जंगी 'फीस्ट' दिली.

बाळंतपणाला महिना झाला, तेव्हापासूनच मुक्ताला परत येण्याबद्दल प्रभाकरानें पत्रें पाठविण्यास सुरुवात केली. आपला हा उतावीळपणा होत आहे हें त्याला कळत होतें. पण, त्याचा अगदी नाइलाज होता.

मुक्ताशिवाय घरात राहणें त्याला दिवसेंदिवस अशक्यप्राय होऊं पाहत होतें.

प्रथम प्रथम पाठविलेल्या पत्रातून प्रभाकरानें आपली खरी भावना व्यक्त होऊं न देता जणूं आपल्याला आपल्या लाडक्या चिरंजीवाचें मुख पाहण्याची, त्याला हृदयाशी धरण्याची, अगदी उत्सुकता लागली आहे असा बहाणा केला. मुक्ताला तो खराहि वाटला. तिलाहि आपला मुलगा पतीच्या मांडीवर खेळत असलेला पाहण्याची उत्सुकता होतीच.

अखेर एक दिवस प्रभाकरला मुक्ताकडून पत्र आलें, की 'खर्चासाठीं कांहीं पैसे पाठवून द्या, म्हणजे मी पुण्याला येतें.'

प्रभाकरला फार आनंद झाला. पत्र पुरतें वाचून पाहण्याइतकाहि धीर त्याला निघाला नाही. त्यानें ताबडतोब पैशासाठी आपलें पाकीट व 'तिजोरी' धुंडाळून पाहिली. पण, त्यात काय असणार? पुण्यासारख्या शहरात राहणाऱ्या तरुणाजवळ पैसा शिल्लक राहिलेला कोणी पाहिला आहे काय?

चिंतेची छाया प्रभाकराच्या चेहऱ्यावर पसरली. पण, ती फार वेळ टिकली नाही. प्रखर सूर्यकिरणांपुढें विरळ धुके किती वेळ टिकाव धरणार? त्याला एक कल्पना सुचली व ती त्यानें ताबडतोब अमलातहि आणली.

आपल्या एक दोन जानी दोस्ताकडे उसनवारी करून वीस-पंचवीस रुपयांची मनि ऑर्डर प्रभाकरानें त्याच दिवशीं मुक्ताच्या नांवें पाठविली, आणि तीबरोबरच ताबडतोब निघून येण्याबद्दलहि आग्रहपूर्वक लिहिलें.

आणि नंतरचे चार-पांच दिवस प्रभाकराची मनःस्थिति ताणलेल्या रबरासारखी झाली होती. रोज तो मुक्तेच्या पत्राची वाट पाही, आणि रोज त्याच्या शिव्या खात बिचारा पोस्टमन त्याच्या दारावरून पुढें निघून जाई!

प्रभाकराला मुक्ताचा भयकर राग आला. तिला एक सणसणीत पत्र लिहून चागला दम द्यावा, असे त्याला रोज रोज वाटे. पण, लग्न होऊन दोन वर्षेहि न झालेल्या प्रेमी तरुणाला असले धाडस प्रत्यक्ष कसें करवणार?

मुक्तेला झाले तरी प्रभाकराचा अंत थोडाच पाहावयाचा होता? बायकांच्या अडचणी सहसा पुरुषाच्या ध्यानी येत नाहीत. पण, पुरुषांच्या गरजा बायकाना न सांगताच कळतात. पाच-सहा दिवसानी मुक्ताचें पत्र आलें व त्यात तिनें आपल्या येण्याचा नक्की दिवस व गाडी कळविली होती.

आज सकाळच्या गाडीने मुक्ता येणार असल्यामुळे प्रभाकराची कोण धादल उडून गेली होती! तिला आणण्यासाठी त्याला स्टेशनवर जावयाच होतें, आणि गैरहजेरीत घराला आलेली धर्मशाळेची अवकळा नाहीशी करून घर व्यवस्थित लावण्याचें कामहि त्याला करावयाचें होते. असला अजागळपणा मुक्ताला मुळींच खपणार नाही, हे तो पूर्णपणे ओळखून होता.

म्हणून सूर्योदयाबरोबर उठून स्वारी उद्योगाला लागली. सामानाची कशीबशी व्यवस्था लावून त्याने खोलीचा दर्शनी भाग झक्कपक्क केला. मुक्ताला आल्याबरोबर स्वहस्तें तिच्या आवडीचा खुमासदार ग्रीन लिप्टन चहा करून देण्याच्या उद्देशानें प्रभाकरानें सारी तयारी करून ठेवली. लाडक्या पत्नीला, आणि त्यातून नुकत्याच बाळंतपणातून उठलेल्या पत्नीला, एकदम स्वैंपाकादि घरकाम करायला लागूं नये म्हणून खानावळींतून डबे मागविण्याची सुद्धा प्रभाकरानें तजवीज केली होती.

सर्व जामानिमा यथास्थित व मनपसंत असा करून व पाच दहा वेळ तरी आरशात फिरून फिरून बघून प्रभाकर स्टेशनावर जाण्या-साठीं घराबाहेर पडला. त्याची सायकल आज अगदीं भरवेगानें चालली होती.

तो स्टेशनवर पोंचला तेव्हा गाडी येण्यास दहा मिनिटें होतीं. त्याने एक वर्तमानपत्र खरेदी केलें, पण तें वाचण्याकडे त्याचें लक्षच लागेना. त्याची नजर एकसारखी बावट्याच्या रोखानें दूरवर कोठें गाडी दिसते का तें न्याहाळीत होती.

गाडीचा धडधड असा आवाज दुरून ऐकू येऊं लागला, तेव्हा प्रभाकराच्या हृदयाचे ठोकेहि जोरानें पडूं लागले. तो प्लॅटफॉर्मवर अगदी पुढें जाऊन उभा राहिला. आपल्या नजरेसमोर जाणाऱ्या गाडीच्या धावत्या डब्यात घारीसारख्या तीक्ष्ण नजरेनें तो आपल्या माणसाचा शोध घेत होता.

अखेर तो बायकांच्या डब्यापाशीं थांबला, तेव्हां त्याची धावती नजर स्थिर झाली.

गरम शालींत गुंडाळलेल्या बाळाला नीट सावरून गाडीतून उतरणाऱ्या मुक्ताकडे नजर जाताच प्रभाकराच्या हृदयात कसल्या तरी विलक्षण संवेदना उठल्या. कमलपत्रावरील जलबिंदूप्रमाणें त्याची नजर मुक्ताच्या सौंदर्यावर स्थिर राहीनाशी झाली.

पुढें होऊन त्यानें बाळाला मुक्ताच्या हातून आपणाकडे घेतलें. मुक्तानें प्रेमस्निग्ध दृष्टीने त्याच्याकडे आपादमस्तक पाहून असे गोड मोहक स्मित केले, कीं तिच्या साऱ्या अपराधाची प्रभाकरानें तत्क्षणीच तिला क्षमा केली.

तिच्या सुंदर मधुराननावरून दृष्टि न चळूं देता प्रभाकरानें तिच्या स्मिताला हास्याचें उत्तर देऊन म्हटलें—

"अखेर बिचाऱ्या नवऱ्याची आठवण झाली म्हणायची राणीसाहिबाना! एकूण दोन वर्षांच्या ओळखीच्या नवऱ्यापेक्षा हा दोन महिन्यांच्या ओळखीचा पाहुणाच भाग्यवान् म्हणायचा."

आपले डोळे कृतक कोपानें विस्तारून मुक्ताने लाडीक स्वरात निषेधपूर्वक विचारलें—

"इश्श! पाहुणा का तो?..."

पुढें काही बोलण्याचा मुक्ताचा विचार होता, पण इतक्यात गाडीच्या डब्यातून कोणी तरी उद्गारलें—

"हे ग काय मुक्ते? भारीच धादरट बाई तू! खुशाल नवऱ्याबरोबर गप्पा छाटीत बसलीस. आता हें तुझं सामान मी एकटी म्हातारी कशी उतरवूं खालीं?"

क्रिकेटचा खेळ ऐन रंगात यावा, आणि एकदम पावसाची जोराची सर यावी तसें होऊन, या उद्गारानी प्रभाकर व मुक्ता याच्या प्रेम-

मीलनात एकदम खंड पडला. इतका वेळ प्रभाकरानें त्या म्हातारीकडे पाहिलेंच नव्हतें. बाळंतपणातून नुकत्याच उठलेल्या मुक्तेच्या बढत्या सौंदर्यानें त्याची नजरबंदी केली होती. तो सारें भोंवतालचें जग पार विसरून गेला होता.

पण, त्या अरसिक म्हातारीनें दोन मीलनोत्सुक पुष्पाची ताटातूट करून टाकली!

प्रभाकर मनात सतापला! खूप चरफडला. म्हातारीचे शुष्ककाष्ठ बरोबर घेऊन आल्याबद्दल त्याला मुक्तेचा रागहि आला. ज्या उत्कटतेनें त्यानें मुक्ताला परत येण्याची घाई चालविली होती ती त्याची प्रणयवासना या म्हातारीच्या आगमनानें अतृप्तच राहणार होती.

मनात कितीहि राग आला असला, तरी बाह्यात्कारी हसून प्रभाकरानें म्हटलें—

"ओहो, मावशी, तुम्ही आलात का बरोबर? अरे वा! भाचीवर फारच प्रेम बुवा तुमचं!"

मावशी काही म्हणाल्या, पण तिकडे प्रभाकराचे लक्षच नव्हतें. त्याच्या मनोराज्याचें काचगृह मावशीच्या आगमनाच्या दगडाने पार भंगून गेलें होते! आता ही थेरडी घरात आहे तोपर्यंत मुक्ताच्या सहवाससुखाची आशा करायला नको, हें तो अनुभवानें ओळखून होता. त्यामुळें तो मनातून संतापून गेला होता.

त्यानें हमालाकरवी सामान बाहेर काढविलें, स्टेशनबाहेर येऊन एक टांगा ठरवून त्यात मंडळीना बसविले. मुलाला तर त्यानें केव्हाच त्याच्या आईकडे परत केला होता. मुलाचा चेहरा पाहण्याच्या उत्सुकतेनें अधीर झालेल्या प्रभाकरानें (पतीची पत्रें वाचून मुक्तेचा तसा ग्रह

झाला होता.) त्याचें मुखावलोकनहि करू नये याचें मुक्ताला किंचित् नवल वाटलें. पण, स्टेशनवरच्या गडबडीमुळेंच प्रभाकरानें तसें केलें असावें, अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली.

मंडळी घरी आली. पण, प्रभाकराचा पहिला उत्साह काही आता राहिला नाहीं. मावशीच्या अडगळीमुळें प्रभाकराला मुक्ताशी मनमोकळेपणें वागता येईना. मुक्ताहि मावशीच्या पहाऱ्यात फार असे. नुकतीच बाळतपणातून उठलेली असल्यामुळं तिला काही कमीजास्ती मावशी करूं देत नसत, त्यामुळें प्रभाकर आपल्या खोलींत स्वतःशी चरफडत बसला. आणि तिकडे मुक्ता माजघरांत बसून मावशी करतील ते सोपस्कार निमूटपणें करून घेत राहिली.

मावशींनीं घरात आल्यावर झाडलोट करून चहा केला व स्वतःच प्रभाकराला आणून दिला. कपबशीबरोबर नाजूक कंकणरवहि नाहीं नि गोड स्मितहास्यहि नाही! त्यामुळें मावशींनीं कपाला तीन चमचे साखर घातली असूनहि प्रभाकराला चहा कडूच लागला.

मुक्ताशी किती तरी गोष्टी बोलण्याचा त्याचा बेत होता. आपल्या आरामखुर्चीसमोर ती कोपऱ्यातली वेताची खुर्ची ठेवून तीवर मुक्ताला बसवून तिचे नाजूक पिवळसर हात आपल्या हातात दाबून, तिच्या मधुर सौंदर्याचें आकंठ पान करीत सुखानें प्रेमसंवाद करण्याची त्याची बलवत्तर इच्छा होती! पण—

मुक्ताच्या नाजूक किन्नरस्वराऐवजी मावशीच्या राकट स्वरातील शब्दाचे गोळे त्याच्या कानातील पडद्यावर आदळले—

"पत, हे एवढं सामान आणा पाहूं बाजारातून आधीं. अहो, बायको यायची घरी, तर घरांत काय आहे नाही एवढं तरी पाहायचं कीं नाही ? घरात मेले तादूळ सुद्धा नाहीत, नुसता भात उकडीन म्हटलं तर."

बिचारी मावशी ! ती आपले तारुण्य केव्हाच विसरून गेली होती. तिला काय कल्पना, की तरुण जोडप्याला भौतिक जिनसापेक्षा हार्दिक प्रेमाचीच भूक अधिक असते ?

चरफडत प्रभाकर उठला नि ती यादी घेऊन बाजारांत गेला. त्याच्या पायातील सारी शक्ति नाहीशी झाल्याचा त्याला भास झाला. त्याच्या मनात कसला विचार चालूं होता हें त्याचें त्यालाच सागता आलें नसतें. दृष्टि शून्यपणें सैरावैरा भटकत होती.

बाजार करून प्रभाकर परत घरी आला, तेव्हा मावशीबाई मुक्ताला स्नान घालीत होत्या, आणि माजघरात गादीवर निजविलेलें पोर जोरा-जोरानें केकाटत होतें. प्रभाकराच्या एकदा मनात आलें, की पोराला उचलून घेऊन गप्प करावें. त्यानें तसा प्रयत्नहि करून पाहिला; पण दोन अडीच महिन्याचे पोर प्रभाकरासारख्या अननुभवी तरुणाला कसें संभाळता येणार? पोरानं जास्तच जोरानें रडण्यास सुरुवात केली.

मुकाट्यानें मुलाला परत अंथरुणावर ठेवून प्रभाकर जो घराबाहेर पडला तो मग जेवणाच्या वेळेपर्यंत काहीं घरी परतला नाही. आणि कसेबसे चार घास घशाखाली कोंबून स्वारी जी पुन्हा घराबाहेर गेली, ती रात्री जेवणाच्या वेळी फिरून घरी उगवली.

आणि नंतर त्याचा हाच रोजचा कार्यक्रम होऊन बसला. घरात त्याची पूर्वीप्रमाणें चडदास्त राहू लागली खरी, पण प्रभाकराच्या तारुण्यसुलभ पुरुषी हृदयाला ज्या प्रणयसुखाची लालसा वाटत होती तें त्याला मिळत नसल्यामुळे, प्रभाकराचे लक्ष पहिल्यासारखें घरांत रमेनासें झालें. मावशीच्या हातची व्यवस्था प्रभाकराला नेहमीं सदोष वाटे. पण, मुक्ता काही त्याच्या वाऱ्याला येईना. मुलगा जरासा चिरचिरा असल्यामुळें मुक्ताला त्याच्याकडेच अधिक लक्ष देणे भाग पडे. पण, त्यामुळे प्रभाकराचा राग वाढत गेला.

केवढ्या उत्सुकतेनें प्रभाकरानें मुक्ताला बोलाविलें होतें. तिच्या आगमनानंतर पूर्वीच्या संसारसुखाची गोडी मागील अंकावरून पुढें चालू करण्याची त्याची केवढी उमेद ! पण ती सारी हृदयस्थ आकांक्षा हृदयातच दडपून ठेवणें त्याला भाग पडलें. पुत्रप्राप्तीचा आनंदहि त्याला वाटावा तसा वाटेना. मुक्ता घरीं आली, तरी पूर्वीप्रमाणें घर-कोंबडेपणा पतकरावासा प्रभाकराला वाटेना. तो आपला सारा दिवस मित्रमंडळींच्या संगतीतच घालवूं लागला.

प्रभाकराच्या या चमत्कारिक वर्तनाचें मुक्ताला नवल वाटल्या-वाचून राहिलें नाहीं. आपण उशिरा परत आलों त्याचा राग प्रभा-करानें आपल्या लाडक्या बाळावर काढावा हें तिला कसेंसेंच वाटे. त्याबद्दल प्रभाकराचा तिला रागहि येई. तिनें चार-पाचदा बळेंच मुलाला प्रभाकराच्या हातीं देण्याचा यत्न करून पाहिला. पण, प्रभाकराला त्याला नीट घेता न आल्यानें पोरगा रडे, आणि मग प्रभाकराला जास्तच चीड येई.

मुक्ताला आपल्या पहिल्याच मुलाचें कौतुक वाटणें स्वाभाविक होतें.

त्या पोराच्या दिमतीत तिचा सारा दिवस खर्च होई; पण प्रभाकराला मात्र त्याचा राग येई. त्या पोरामुळे मुक्ताच्या सहवाससुखाला आपण आचवत आहोंत, अशी विचित्र कल्पना त्याच्या डोक्यात घुसली. आणि त्यामुळें मुलाचें लडिवाळ कौतुक करण्यात मुक्ता स्वतःला विसरून गेली, कीं प्रभाकर कपाळाला आठ्या घालून दुसरीकडे निघून जाई.

मुक्ताला प्रभाकराच्या या वर्तनाचें आश्चर्य वाटे, रागहि येई. पण, त्याचें कारण मात्र तिला समजत नसे, आणि तिला तें कसें समजून द्यावें हें प्रभाकरालाहि समजत नसे. हें कारणरूप पर्ण दोघामधून दूर न झाल्यामुळें चक्रवाक मिथुनाप्रमाणें दोघेंहि आपापल्या ठायींच तळमळत राहिली !

# ॲलिस

एकदां वाटे तीच ही असावी—

आणि एकदा वाटे, छे! नसेलहि ती.

पुन्हा वाटे, तीच ही खास. कालमानानें वयात होणारा फरक सोडला, तर बाकी सर्व चेहरा, शरीराची ठेवण, नाक, डोळे, अगदीं सारें काहीं तसेंच!

पण आणखी वाटे, जगात सारख्या चेहऱ्याची माणसें काय थोडी असतात? प्रेमशोधनात नाही का कंदन आणि नंदन एकाच तोंडावळ्याचे?

मोठ्या विचित्र घोटाळ्यांत माझे मन सापडून भांबावल्यासारखी स्थिति झाली होती माझी!

नजर आपली एकसारखी खिडकीतून दिसणाऱ्या 'आउट हाउस'च्या

व्हरांड्याकडे धाव घेई. जणूं व्हरांड्यात लोहचुंबकाचें सामर्थ्य आलें असून तो माझ्या नेत्रांना आपणांकडे खेचून घेत होता.

मला नेत्र-भ्रम झाला आहे, की मनोविभ्रम होत आहे हेंच कळेना.

होय-नाही, नाही-होय, यानी माझ्या मनःपटावर खो-खोचा डाव सुरू केला होता.

आणि माझा हा मनाचा गोंधळ वाढला होता तो या कारणाने, की व्हराड्यांतील ती व्यक्तीहि अशीच चौकस नजरेनें माझ्याकडे पाहत होती. तिची ती नजर मला जरा चमत्कारिक वाटली. पण, तिची तेव्हाची वागणूक त्याहिपेक्षां जास्त चमत्कारिक होती.

व्हराड्यातून चौथऱ्यावरील दिवाणखान्याची खिडकी दिसावी म्हणून पायाच्या चवड्यावर उभी राहून ती व्यक्ति माझ्याकडे संशोधक दृष्टीनें पाहत राही. माझी न् तिची नजरानजर झाली, कीं ती झटकन् आत पळून जाई. मी चहा पिण्याच्या निमित्तानें मान वळवली, की पुन्हा आपली ती तरुणी व्हराड्यात येई, आणि पाय व मान शक्य तितकी उंचावून माझ्याकडे साशंक नजरेनें पाहूं लागे!

तेवढ्या दहा-बारा मिनिटात हा प्रकार चार वेळा घडून आला.

त्यामुळें तर माझा संशय बळकटच झाला. माझ्याप्रमाणेच तिलाहि माझ्या ओळखीची शंका आली असेल का?

आणि जर ती तशी आली नसेल तर ही म्हणजे तीच होय, यात शंकाच नको.

पण, हे ठरवायचें कशावरून?

तिच्याशी बोलण्याची संधि तरी मिळायला हवी? मग शंका-निवृत्ति आपोआपच होईल म्हणा.

पण तशी संधि न मिळाली, तर एकाच वृक्षाच्या दोन शाखांवर

उमललेल्या दोन मीलनेच्छु फुलांप्रमाणें शेजारी येऊनहि आम्हाला भेट न होतां आपापल्या ठिकाणीच कुढत राहावे लागणार होतें !

काय करावें ?—

पण, ही माझी गूढसमस्या नसरवानजीने अभावितपणेंच सोडवली.

बंगलोरला आल्यावर, परत आपल्या गावी जाण्यापूर्वी, निरोप घ्यायला म्हणून आज मी कॅंटोन्मेंटमधील माझा मित्र नसरवानजी याच्या बंगल्यावर आलों होतों. माझ्यासाठीं केलेला चहा घेण्यासाठीं दिवाणखान्यांतील गोल मेजाभोंवती बसलों आणि गप्पा झोडीत झोडीतच आम्हीं चहापानाला सुरुवात केली. इतक्यात सहजच माझी नजर बाजूच्या खिडकीतून दिसणाऱ्या बगल्याच्या 'आउट हाउस'च्या व्हरांड्याकडे गेली, तों काय ?

व्हरांड्याच्याच एका खांबाला टेकून एक तरुणी सकाळचें कोंवळे ऊन अंगावर घेत आपल्या वक्षःस्थळावर ओढलेल्या वेणीच्या टोकाशीं खेळत उभी असलेली माझ्या नजरेस पडली. स्वाभाविकपणेंच माझी तारुण्यसुलभ जिज्ञासा जागृत झाली, आणि मी त्या तरुणीकडे निरखून पाहूं लागलों.

वेषावरून ती ख्रिश्चन असल्याचें स्पष्ट दिसत होतें. कारण फिक्या तांबूस रंगाचा पाढऱ्या फुल्या असलेला तलम झगा तिच्या अंगात होता. त्या झग्याच्या कापीव मानेमुळें तिचे अर्धे-मुर्धे वक्षःस्थळ उघडें दिसत होतें. खाली छातीलगतच झग्याच्या झालरीची तंग पट्टी आल्यामुळें तिचा उरोभाग किंचित् फुगीर व लंबवर्तुळ दिसत होता. त्या पट्टीपासून झग्याचा खाली सुटलेला पोकळ भाग तिच्या

पिढऱ्यांपर्यंत पोंचला होता. त्यातून तिचें पुष्ट गौराग व्यक्त होत होते. तिच्या पायात लहानसरच उंच टाचेचे पाढरे बूट होते व त्याच्या आंत अगकातीच्या रंगाचे अगदीं पातळ पायमोजे पायांबरोबर बसविलेले होते. त्या मोजांतून तिच्या भरदार पिंढऱ्याचा रेखीवपणा पाहणाऱ्याच्या डोळ्यात चटकन् भरत असे. झग्याची झालर खांद्यां-वरून तिच्या नाजूक दडाना अत्यंत आदबशीरपणानें हळूच स्पर्श करून आपल्या मालकिणीच्या यौवनभराची परिस्फुटता करीत होती. त्यामुळं तिच्या मासल गोल उघड्या दंडावरील आरक्त काति फारच मोहक भासत होती.

तिचे कांहींसें लांबलचक नाक तिच्या उंच कपाळाची शोभा वृद्धिंगत करीत होतें. नाजूक पातळ ओठावर लालसर सडाच साडला होता असा भास होई, आणि या सड्याचाच थोडासा शिडकावा तिच्या गालावरहि झाल्याचें दिसत होतें. तिचे बारीक चंचल डोळे हरणासारखे टुणकन् इकडून तिकडे उड्याच मारीत आहेत, कीं काय असें वाटे—

आणि त्यापैकींच तिच्या नेत्रांची एक उडी माझ्यावर पडली, आणि माझ्यासारखीच तिचीहि विभ्रमावस्था झाली.

तिचें नीट निरीक्षण केल्यावर मला वाटलें, की हा सौंदर्यनिधि माझ्या पूर्ण परिचयाचा असावा. यौवनाची उन्मादक अवस्था तेवढी काळरूपी चित्रकारानें या निधीत नवी घातलेली दिसते. बाकी सारें चित्र माझ्या कोठें तरी पाहण्यांत आलेलें असावें अशी शंका माझ्या मनाला चाटून गेली, आणि मी माझ्या स्मृतिकोषाची मागील काहीं पानें चाळूं लागलों.

सहासात वर्षांपूर्वीचा एक प्रसग माझ्या मानसचक्षूसमोर दिसू लागला —

त्या वेळेस मी इंग्रजी शाळेंत शिकत होतो, आणि आमच्या वर्गा-तल्या काही मुलानी मिळून फुटबॉल खेळण्यासाठी एक जॉली क्लब सुरू केला होता. मीहि त्या क्लबला मिळालें आणि गावाबाहेरच्या ख्रिश्चन मिशन हाउसजवळ असलेल्या एका मोकळया मैदानावर रोज सध्याकाळी खेळावयास जाऊं लागलों.

त्या वेळेस आमचा खेळ सुरू झाला, की शेजारच्या मिशन हाउस-मधून एक छोटी बालिका रोज तेथें येऊन, बाजूस उभी राहून, खेळ पाहत असे. खेळ संपेपर्यंत ती जागची हालायचीहि नाही. मग कितीहि उशीर होवो, की अंधार पडो ! आपले चंचल डोळे फुटबॉल जाईल त्या दिशेस पळवीत ती अत्यंत औत्सुक्यपूर्णतेनें व तन्मयतेने सारा खेळ पाहत राही. त्या खेळाची त्या छोकरीला विलक्षण भुरळ पडली होती. हिप्नॉटाइज झालेल्या माणसारखी ती भारली गेली जणूं!

तिचा तो क्रम कांही दिवस न चुकतां चालू राहिलेला पाहून, एके दिवशी मला तिची दया आली. तिला खेळावयाला घ्यावें असे मला वाटूं लागले. म्हणून मी तिच्याजवळ गेलों व म्हणाले—

" काय बाळ, खेळ पाहतेस होय ? "

माझ्याकडे एकवार पाहिल्यासारखें करून व पुन्हा लागलीच क्रीडांगणावरील फुटबॉलकडे नजर लावून तिनें उत्तर केले—

" होय. "

" आवडतो का तुला हा खेळ ? "

तिनें मानेनेंच होकार दर्शविला.

" मग खेळायला येतेस का ? "

जणू कुणी आपल्या मनांतल्या गोष्टीवरच बोट ठेवावें तशी आनंदून आणि अत्यंत उत्कट आनंदानें डोळे विस्फारून ती उड्या मारीतच म्हणाली—

" हो, हो! घेतां मला खेळायला? अंऽघेतां का? मी तुमच्या-सारखी अश्शी किक् मारीन फुट्बॉलला! "

असें म्हणून किक् मारण्याचा तिनें जो आविर्भाव केला तो पाहून मला हसूं आलें. हसतच मी विचारलें—

" पण, तुझं नाव नाही सांगितलंस तें? "

" माझं नाव ॲलिस. आता घेता मला खेळायला? अं? घेतां का?"

" अग, हो-हो. पण अशी घाई का? आधी मी विचारतों त्या प्रश्नांची उत्तर दे नि मग घेतों तुला खेळायला."

" हं, मग विचारा काय तें? "

" तुझ्या बापाचं नांव काय?"

" जोसेफ."

" तुम्ही या मिशन हाउसमध्येंच राहता का?"

" हो. "

" कोण कोण? "

" मी, ममा, डॅडी आणि लुई. "

" लुई कोण? "

" माझा भाऊ."

" तुझ्यापेक्षा मोठा का धाकटा? "

" धाकटा."

" केवढा आहे तो?"

" सहा वर्षांचा नि मी आहे दहा वर्षांची. "

" बरं पण तुला आम्ही खेळायला घेतलं, तर तुझे बाबा रागावणार नाहींत का ? "

" नाहीं हो नाहीं ! डॅडी फार चागले आहेत."

" पण तसं नको. तूं आपली त्याना विचारून ये कशी."

ॲलिस सशासारखी धांवतच गेली, आणि दोन-चार मिनिटांत पळत आली. तिच्या चेहऱ्यानेंच डॅडीची परवानगी मला कळविली.

आणि ती दशवर्षा बाला—ॲलिस—आमच्या टीममध्यें फुटबॉल, खेळूं लागली. किंवा खरें सागायचें म्हणजे मैदानावर फुटबॉलच्या दिशेनें इकडे तिकडे पळूं लागली. कारण मुलाच्या खेळात तिच्या पायाची व फुटबॉलची गाठ क्वचित्‌च पडे. पण, त्याची तिला पर्वाच नसे. आपणास या टीममध्यें खेळावयास मिळतें या कल्पनेनें तिला एवढा आनंद झाला होता, कीं आपणास खेळतां येत नाही हें ती पार विसरून गेली होती.

छोटा झगा व पाढरी चड्डी घालून वाऱ्यानें उडणारे आपले केस साफ करण्याचा प्रयत्न करीत फुटबॉलच्या दिशेनें इकडून तिकडे पळत राहणाऱ्या त्या भाबड्या पोरीचें मला फार कौतुक वाटे. तिच्या गोड, निष्पाप व सुदर चेहऱ्यानें मला एक प्रकारची भुरळच घातली म्हणा ना. तिला खेळायला मिळण्याचें समाधान थोड्या प्रमाणांत तरी लाभावें म्हणून मी मुद्दाम तिला बॉलला पाय मारण्याची संधि आणून देत असें, आणि तिनें आपल्या गोंडस छोट्या पायांनीं मारलेली किक् थोडीहि जरी उंच गेली, तरी तिला केवढा आनंद होई !

एकदम ती माझ्याकडे डोळे विस्तारून पाही, आणि आपला आनंद आणि अभिमान व्यक्त करी.

अशा रीतीनें क्रीडांगणावर माझी व ॲलिसची गट्टी जमत चालली. तिच्या सुरेख देहलतेनें माझें तिच्याकडे प्रथमतः वेधलेले लक्ष तिच्या बोलण्याचालण्यातील मधुरतेमुळें तिच्याकडे अधिकाधिकच ओढ घेऊं लागलें. खेळाच्या वेळी तिला मी जास्तजास्त मदत करूं लागलों तसतशी ॲलिसहि माझ्याशी जास्तजास्त मोकळेपणानें वागूं लागली.

थोड्याच दिवसात आमची चागली मैत्री जमली. तिला भेटल्याखेरीज मला बरें वाटेनासें झालें. त्यामुळें मी खेळायला जायचे कधींहि चुकविनासा झालो. ॲलिसहि माझ्या आधीच क्रीडागणात तयार असे.

एके दिवशी खेळ संपून आम्ही परत जाण्यास निघालों असतां, ॲलिस मला हलकेच म्हणाली—

" एक गोष्ट तुम्हाला विचारायला डॅडीनीं सागितलं आहे मला."

" काय ग ? "

" तुमच्याशीं ओळख व्हावी अशी त्याची नि ममाची फार इच्छा आहे. उद्या सकाळीं तुम्हांला चहाला बोलवायला सागितलं आहे त्या दोघांनीं. याल का ? "

" हो-हो, अगदी जरूर येईन हं ! "

माझी संमति मिळाल्यानें झालेला आनंद तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट चमकला. ती उत्साहभरित स्वरात म्हणाली—

" सकाळी आठ वाजतां या. याल ना ? "

" हो, येईन."

माझी संमति बापाला कळविण्यास ती उद्या मारीतच पळत घराकडे गेली. वर्षा ऋतूंत पाण्यानें तुडुंब भरलेली जलवाहिनी जशी धावत जाते, तशी ती आनंदभरित बालिका भासली मला तेव्हां!

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशी सकाळी मी त्यांच्याकडे चहाला गेलों. ॲलिसचे आईबाप दोघेंहि प्रेमळ, मनमोकळे व स्वागतशील दिसले. ॲलिसला खेळायला घेतल्याबद्दल त्यांनीं माझे राहून राहून आभार मानले. ॲलिसनें माझ्या चांगुलपणाच्या किती तरी गोष्टी आई-बापाना सांगितल्याचें त्यानी मला सांगितले, तेव्हा मला थोडें लाजल्यासारखें झालें.

तास दीड तास गप्पा-गोष्टी झाल्यावर मी जाण्यास निघताना त्याना म्हटलें, "तुम्ही दोघंजण आज या ना संध्याकाळीं ग्राउंडवर सवड असली तर. ॲलिस कशी काय खेळते ते पहा तर खरं."

"हो-हो, that's an idea!" डॅडी उद्गारले व ममानें त्याला सास्मित संमति दिली.

संध्याकाळी दोघेहि क्रीडांगणावर न चुकतां आली. आपल्या लाडक्या कन्येचा खेळ पाहून वात्सल्यपूर्ण कौतुकानें आणि आनंदानें समाधान पावून तीं त्या दिवशीं परत गेली. मात्र जाताना माझे पुन्हा एकवार मनःपूर्वक आभार मानण्यास तीं दोघेंहि विसरलीं नाहीत.

यानंतर नमूद करण्यासारखा एकच प्रसंग घडून आला. तसले प्रसंग पुन्हा घडून येण्याची शक्यताच नाहीशी झाली.

एके दिवशी आमच्या घरी काही तरी सण होता, आणि त्यानिमित्त

कांही गोडाधोडाचा बेत होता. आईनें स्वैपाकाचा कांहीं विशेष बेत केल्याचें दिसतांच माझ्या मनात एकदम कल्पना आली.

—आज ॲलिसला जेवायला बोलवावें— !

लगेच उठलों नि सायकलीवरून मिशन हाउस गाठलें.

दारातच ॲलिसचें डॅडी भेटले. त्याना मी माझ्या आगमनाचा हेतु सागितला, आणि पोरीला पाठवून देण्याची विनंति केली.

त्यांनीहि आनंदाने तात्काल संमति दिली.

—आणि ॲलिसला सायकलवर पुढं घालूनच मी घरी आलों.

ॲलिसच्या सहवासात त्या दिवशीं माझा बराच वेळ गेला. तिनें मिशन हाउसमधील कांही गंमती मला सागितल्या. आपल्या सुरेल आवाजात दोन इंग्रजी गाणीहि म्हणून दाखविली व तो माझा दिवस किती तरी आनंदात व सुखात गेला.

त्यानंतर लौकरच ॲलिस एकाएकीच कोठें दिसेनाशी झाली ! मी खूप चौकशी केली, पण मिशनमधील नोकरी जोसेफ सोडून गेला, यापेक्षा अधिक काही बातमी मला कळली नाही.

पुढे पुढें लहानपणाची ती आठवण हळूहळू बुजतहि गेली !

पण, आज बंगलोरमधील माझा मित्र नसरवानजी याच्या बंगल्यांत चहा पीत बसलों असता, 'औट हाउस'च्या व्हराड्यांत उभ्या असलेल्या एका ख्रिश्चन तरुणीकडे पाहताच एकदम मला अलिसची आठवण झाली, आणि 'ही ती ॲलिस तर नव्हे ?' असा संभ्रम मला पडून मन गोंधळून गेलें.

माझी बावरलेली स्थिति नसरवानजीच्या ध्यानी आली नि त्यानें विचारलें—

" काय मि. मराठे, कसल्या विचारात पडला आहांत एवढे ? चहा सुद्धा पिण्याचं भान नाही राहिलं तुम्हांला ! "

सांगावें न सांगावें याचा स्वतःशीच विचार करीत मी नसरवानजी-ला प्रश्न केला, " ही आता व्हराड्यात उभी होती ती कोण हो ? "

" हां, ती छोकरी होय ? ती आमच्या शॉपच्या कौंटरची मुलगी आहे. कशी फक्कड आहे नाहीं ? "

नसरवानजी हें काहींशा चेष्टेनें म्हणाला होता हें मी ओळखलें; पण तिकडे दुर्लक्ष करीत मी विचारलें—

" हा कौंटर किती दिवस आहे तुमच्याकडे नोकरीला ? "

" तीन साडेतीन वर्षं झाली असतील मला वाटतं. मोठा हुशार नि गोड माणूस आहे."

" आणि इथं येण्यापूर्वी तो कुठं होता ? "

" मंगलूरला कांहीं दिवस होता. त्यापूर्वी हुबळीलाहि होता."

" आमच्या गावीं होता का कधीं ? "

" अरे साब, तें काय मला माहीत ? –पण, तुम्ही फारशी बारीक चौकशी चालवली आहे त्याची ? काय, त्याच्या पोरीवर मन गेलं वाटतं ? "

" छट् ! बामनाचा बच्चा ख्रिश्चन पोरीवर कशाला प्रेम करतोय ? "

" मग मघापासून तिच्याकडे असं एकसारख टक लावून काय पाहणं चालवल आहे निरखून ? साला, मी समोर बसलोंय याची दखलहि नाय ठेवली तुम्हीं."

खरेंच, असें झालें होते खरें. माझी वागणूक फारच विचित्र झाली होती. नसरवानजीचा कांहीं भलताच ग्रह होणें देखील अशक्य नव्हते, इतका मी खुळ्यासारखा वागलों होतों. तेव्हा नसरवानजीला कांहीं वाईट-साईट शंका आली असल्यास ती दूर करण्यासाठी तरी त्याला सारी हकीकत सागणें जरूर होतें.

याप्रमाणें सर्व कथा साद्यंत सांगून झाल्यावर मी म्हणालों—

"आणि म्हणून मी मघापासून सारखा वळून वळून पाहून खात्री करून घेत आहे, की तीच ही ॲलिस की काय?"

माझी हकीकत शातपणें ऐकल्यावर नसरवानजी म्हणाला—

"तीच ही छोकरी कीं काय, हें मला तरी कसं सागता येणार? पण जसं तुमच्या त्या मुलीच्या व इच्या रूपांत विलक्षण साम्य आहे तसंच हिचं नांव सुद्धा तेंच आहे— ॲलिस!"

"काय? ॲलिस?" मी आश्चर्यानें ओरडलों.

"होय."

"मग तर शंकाच नको. तीच ही पोरगी."

"पण तसं कशाला? आपण तिलाच बोलावून विचारूं कसे." असे म्हणून नसरवानजी उठला. खिडकीशी जाऊन त्यानें ॲलिसला हाक मारली.

यौवनभारानें मंदगति झालेली ती सुंदरी दिवाणखान्यांत येऊन आमच्यासमोर धीटपणें उभी राहली. पण तिला काय विचारावें हें मला सुचेना. तेव्हां नसरवानजीच म्हणाला—

"ॲलिस, तूं यांना पूर्वी कुठं पाहिलं होतंस का? आठवतं का तुला?"

" होय, आम्हीं कोल्हापुरला होतों तेव्हां मी रोज पाहत होतें याना."

" कुठ ?"

" मिशन हाउसजवळच्या माळावर हे फुटबॉल खेळायला येत असत, हो ना हो ?"

शेवटचा प्रश्न अर्थातच मला उद्देशून होता. मी हसून म्हटलें—

" वा, तुझी आठवण चांगलीच धड आहे की ! मला काही इतकं नक्की नसतं सागता आलं."

ॲलिस काहीशी हसली मात्र.

" तुझे डॅडी, ममी नि भाऊ सगळीं बरी आहेत ना ?"

मीं काहीं तरी विचारायचें म्हणून विचारलें.

" ते पाहायला तुम्ही आमच्या घरी चला ना ?"

" काय ? तुमच्या घरी ?"

" काय हरकत आहे ? पूर्वी एकदां नव्हता का आलां आमच्याकडे चहाला ? तसंच आज चला. डॅडीला नि ममीला कित्ती आनंद होईल तुम्हाला पाहून ! याल ?"

तिच्या आवाजात स्निग्धता होती. तिच्या डोळ्यात आर्जवीपणा होता. मला नाही म्हणवेना. नसरवानजींचा निरोप घेऊन मी ॲलिसबरोबर तिच्या बिऱ्हाडी गेलों.

तिनें आपल्या आईबापांना माझी आठवण करून दिली. त्याबरोबर त्या दोघानाहि फार आनंद झाल्याचें दिसून आलें. त्यानीं माझी किती अगत्यानें हरतऱ्हेनें चौकशी केली. मध्यंतरी नोकरीच्या मागें आपण स्वतः कोठें कोठें भटकलो तेंहि सागितलें त्यांनीं मला.

आमच्या गप्पा सुरू असताच ॲलिसनें चहा तयार केला, आणि तो कपात ओतून आमच्यापुढें ठेवला. एकत्र बसून आम्हीं सर्वजण चहा घेत असता सहा-सात वर्षांपूर्वीच्या अशाच एका प्रसंगाची आठवण झाली. चहापानाचा हा दुसरा प्रसंग किती विलक्षण योगा-योगानें आज जमून आला, त्याचें सर्वांनाच नवल व कौतुक वाटलें.

या निमित्तानें फुटबॉलच्या खेळाच्या किती तरी मजेदार आठवणी निघाल्या. आणि त्या वेळचा तो निरागस आनंदाचा बाळपणाचा काळ मी पुन्हा प्रत्यक्ष अनुभवीत आहें, असा काहीं काळ मला भास झाला!

आमच्या संभाषणांत ॲलिसहि मोकळेपणानें भाग घेत होती, आणि आपल्या मार्मिक बोलण्याने एकंदर संभाषणाची मधुरता वाढवीत होती. फुटबॉलच्या खेळाच्या व आमच्या घरांतील जेवणाच्या किती तरी बारीक आठवणीहि तिनें भराभर सांगितल्या तेव्हा तर तिच्याविषयीचा माझा स्नेहभाव अधिकच वाढल्याचें मला आढळून आलें. आज इतकीं वर्षे ॲलिसनें माझी आठवण अंतःकरणात साठवून ठेवलेली असावी, याचा मला अचंबा वाटला. आणि जेव्हां त्या प्रेमळ कुटुंबाचा निरोप घेऊन मी तेथून जावयास निघालों, तेव्हा ॲलिसनें माझ्याकडे ज्या भावपूर्ण कृतज्ञ दृष्टीनें पाहिले, त्यामुळें माझ्या मनांत एकच विचार घोळू लागला की—

"खरंच, स्त्रीहृदय किती गूढ रम्य आहे!"